ज्यांनी आपल्या औदार्यानें आर्थिक आधार दऊन माझ्या जीवनांत विशेष माधुर्य निर्माण करण्यास साहय केलें त्या

शेठ गणपतराम जेठाराम मेथा, वास्कोडिगामा-गोंवा,

यांस हें पुस्तक आदरपूर्वक अर्पण.

—लेखक.

# हितगुज.

---

रसिक मराठी वाचकांच्या हातांत "शहाळीं" देतांना मला आनंद होत आहे.

मराठीपेक्षां इंग्रजी लेखन हें अर्थोत्पादनाच्या दृष्टीनें बरेंच फायदेशीर असल्यानें गेल्या तीन चार वर्षांत इंग्रजी लिहिण्याकडेच माझा विशेष ओढा लागला आणि अर्थातच प्रेमळ आईपेक्षां दुध देणाऱ्या परक्या दाईचंच प्रेम मला जास्त वाटूं लागलें. तरीपण, मातृभाषेचा जाज्वल्य अभिमान आणि कांहीं रसिक संपादक-वाचकांचा आग्रह या द्विविध कारणांमुळें जें कथासाहित्य अधूनमधून निर्माण झालें त्याचाच हा संग्रह होय.

माझ्या 'कणसाचे दाणे' या कथासंग्रहाला हिंगणे येथील नाथीबाई ठाकरसी महिला विद्यापिठानें आपल्या सर्व शाखांमधून पाठ्य पुस्तक म्हणून मान्यता दिली, पुण्याच्या डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीनें त्याची मुक्तकंठानें प्रशंसा केली आणि महाराष्ट्रांतील बहुतेक सर्व नियतकालिकें व नामांकित साहित्यिक यांनीं गुणगौरव केला. ह्या हुरूपामुळेंच हा नवा कथासंग्रह प्रकाशित होत आहे.

कथावाङ्मयांतून मानसिक आंदोलनाचा इतिहास निर्माण होत असतो. त्या आंदोलनांतून व्यक्तित्वाचा विकास होत असतो, आणि त्यांतून जीवनाचा आविष्कार होत जातो. माझ्या पूर्वीच्या कथासंग्रहांतील कथांप्रमाणेंच या संग्रहांतील कथाहि मानवी मनाच्या आंदोलनावर आधारलेल्या आहेत -- सत्यसृष्टींतील प्रत्यक्ष घटनांच्या पायावर उभारलेल्या आहेत. कित्येक कथांतील प्रसंग कमी अधिक प्रमाणांत सत्य आहेत तर कित्येकांतील व्यक्ति प्रत्यक्ष पाहिलेल्या आहेत. मानवी स्वभावाचे जे जे बरेवाईट नमुने माझ्या प्रत्यक्ष अवलोकनांत आले आणि ज्या प्रसंगाची मला प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष अनुभूति मिळाली त्या व्यक्तींच्या स्वभावांचीं आणि प्रसंगांचीं हीं स्मृतिचित्रें आहेत. या कथांवर कलेची गडद छाया पडली नसेल पण या कथा म्हणजे मानवी जीवनांतील आशा, आकांक्षा, विचार आणि विकार यांची वास्तवपूर्ण नोंद आहे -- विविधतापूर्ण जीवनाचा हा इतिहास आहे.

माझे स्नेही श्री. बा. द. सातोस्कर, बी. ए. यांनीं प्रस्तुत पुस्तक प्रकाशित केल्याबद्दल त्यांचे आभार मानणें हें मी माझें कर्तव्य समजतों.

मडगांव-गोवा.
ता. १५-१२-४०

सां. घ. कंटक



# सागर साहित्य

---

## आमचें वाङ्मय

| | | | |
|---|---|---|---|
| १ | सागराच्या लाटा | प्रो. लक्ष्मणराव सरदेसाइ | १ रु. |
| २ | गुलाब गेंद | जयवंतराव सरदेसाई | १२ आणे |
| ३ | वादळांतील नौका | प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई | १ रु. |
| ४ | कुळागार | सं.– बा. द. सातोस्कर | १ ,, |
| ५ | वैमानिक हल्ला | भा. वि. वरेरकर | १। ,, |
| ६ | निशिकांतची नवरी | अनंत काणेकर | १० आणे |
| ७ | तुटलेले तारे | ,, ,, | १ रु. |
| ८ | कारंजाचे तुषार | व्यं. अ. पै रायकर | १। ,, |
| ९ | किनाऱ्यावर | प्रो. वि. द. साळगांवकर | १ ,, |
| १० | धुक्यांतून लाल ताऱ्याकडे | अनंत काणेकर | २। ,, |
| ११ | उंबराचीं फुलें | ह. वि. देसाई | १४ आणे |
| १२ | दिव्यावरती अंधेर | अनंत काणेकर | १। रु. |
| १३ | शहाळीं | सां. घ. कंटक | १४ आणे |
| १४ | वेल विस्तार | म. सी. जोशी | १ रु. |

४ आणे प्रवेश फी भरून कायम ग्राहक होणाऱ्यास साहित्या'चें प्रत्येक पुस्तक पाऊणपट किंमतीस मिळेल.

'सागर साहित्य' कार्यालय
त्रिभुवन रोड, मुंबई ४

# श्री कंटक यांचें वाङ्मय

---

**प्रकाशित**

कणसाचे दाणे ( कथासंग्रह )
आर्यस्त्री ( कादंबरी )
सुमनगुच्छ ( कथासंग्रह )
स्वयंसेविका ( लघुकादंबरी )
शहाळीं ( कथासंग्रह )

**१९४१ संकलिपन**

जाईचीं फुलें (कथासंग्रह) (छापत आहे.)
जयंती ( कौटुंबिक कादंबरी )
अखेरची आशा ( राजकीय कादंबरी )
कंटक (विनोदी 'बोंचक' लेखांचा संग्रह.)

---

# मायेच्या पोटीं

नोकरपेशा माणसाच्या घरांत रविवारचा दिवस नेहमींच विशेष आनन्दाचा असतो. आपल्या आवडत्या माणसाचा जास्तींत जास्त सहवास–लाभाचा आनंद उपभोगण्याचा आठवड्यांतील तो एकच दिवस नव्हे का ?

फ्लोरा आज अशाच हर्षांत होती. आपल्या नवऱ्यासाठीं त्याच्या आवडीचे कितीतरी पदार्थ तिनें परिश्रमपूर्वक तयार केले होते. विविधरंगी आरशांनीं आच्छादिलेल्या रमणीय व्हरांड्यांत आज तिनें जेवणाचें मेज मांडलें होतें. मेजावर शुभ्रवर्णी चादर पसरविली होती. मध्यभागीं नकशीदार रुपेरी स्टँडमध्यें ताज्या सुवासिक फुलांचे गेंद सुबकतेनें रचून ठेवले होते. एका उथळ बशींत निरनिराळ्या

प्रकारचीं ताजीं फळें, दुसऱ्या एका ट्रेमध्यें उंची–उंची दारुच्या लहान मोठ्या बाटल्या ठेवण्यांत आल्या होत्या. आणि ती मोठ्या उत्कंठेनं आपल्या नवऱ्याची वाट पहात होती. सहज एका मित्राकडे म्हणून तेनेंत गेले होते खरे. पण अकरा वाजले तरी ते कांहीं परतले नव्हते. फ्लोराप्रमाणेंच तिचीं मुलेंहि बापाच्या आगमनाची आतुरतेनें वाट पहात होतीं.

— ममा, पपा केव्हां येईल ग ? — आईच्या झग्याची बाही लाडिकपणें चिमुकल्या हातांत घेत तिच्या केंसांच्या बटांशीं खेळत एकानें विचारलें.

— ममा ! मी सांगूं ? पपा आज फारच उशीरानं येणार ! मला धांवणारी मोठी मोटारगाडी घ्यायला गेला आहे तो ! पपा मला गाडी घेऊन आला तर ठीक ! न पेक्षां—

— न पेक्षां काय करशील ? — डोळे वटारीत फ्लोरानें विचारलें.

— मी पुष्कळ पुष्कळ रडेन !

— हात्तिच्या ! एवढंच भय घालतोस ना तूं आम्हांला ? तुझा ग्रामोफोन कधीं बंद झाला आहे का पोरा ? गुणांचा–मोठ्या गुणांचा बाळ माझा ! खायला पाहिजे ! खेळायला–दंगा मस्ती करायला पाहिजे ! शिकायला मात्र नको ! — त्या घाऱ्या डोळ्यांच्या गुटगुटात मुलाला अलग उचलून फ्लोरानें जवळ घेतला आणि प्रमुदित अंतःकरणानें ती त्याचे पटापट मुके घेऊं लागली.

इतक्यांत बागेच्या कुंपणाचा लांकडी दरवाजा उघडला गेला व तेनेंत घरांत आले. एखाद्या लहान मुलाच्या प्रसन्नतेनें अगदीं नाचत – बागडत फ्लोरा म्हणाली,

# मायेच्या पोटीं

— केवढा वेळ बाहेर रहायचं? त्याला कांहीं घर-बंद तरी आहे का?

— पण कामाशिवाय राहिलों का मी? फ्लोरा, माझ्या सहवासासाठीं तूं अशी अधीरता धरूं नकोस!

— कां?

— मजसारख्या मिलिटरी पेशांतील कामगाराला युद्धभूमि हेंच घर अन् तरवार हीच अर्धांगी असं मानलं पाहिजे!

— पण आजची गोष्ट तशी नाहीं. आठवड्यांतून मिळणारा एकुलता एक दिवसहि आपल्या माणसाच्या सहवासांत घालविणें तुम्हांला अप्रिय वाटतें ना? इतकी का मी वाईट आहें? माझीं सोनुलीं इतकीं...

— काय बोलतेस हें तूं फ्लोरा? सहज बोलतां बोलतां इकडच्या तिकडच्या गोष्टी निघाल्या, कुणाची बदली कुठं झाली, कोण कोणत्या हुद्यापर्यंत पोंचला या हकिकती ऐकतां ऐकतां एवढा वेळ झाला खरा!

— बरं आतां आणखी वेळ घालवायचा नाहीं!— इतकें म्हणून फ्लोरानें त्याचे कपडे झटपट उतरविले आणि त्याला पेहेरायासाठीं नवीन कपडे आणून दिले.

त्याचीं दोघें मुलें, तो आणि फ्लोरा जेवायला बसलीं. बटलर एक एक पदार्थ आणून वाढीत होता. नवरा बायको एकमेकांस जास्त खाण्याबद्दल आग्रह करीत होतीं. बशींतील अंड्यांच्या पोळ्या तेनेंतला वाढतां फ्लोरा म्हणाली,— एवढ्या साऱ्या खाल्ल्या पाहिजेत हं, त्याशिवाय माझं समाधान नाहीं व्हायचं!

-- पण फ्लोरा, इतकीं अंडीं आणलींस कुठून तूं ?

-- जिथं खुषी आहे तिथं उपाय--युक्त्या सारं कांहीं सुचतं. ताज्या अंड्यांच्या पोळ्या तुम्हांला अतिशय आवडतात म्हणून मुद्दाम पैदा करून अंडीं आणविलीं आणि स्वतः सारी सकाळ खपून ह्या पोळ्या तयार केल्या. त्या तुम्हीं न खातां सांडल्या तर मला केवढं वाईट वाटेल याची आहे का कल्पना तुम्हांला ?

आपल्यावरील फ्लोराची निस्सीम ममता पाहून तेनेंतला अत्यन्त धन्यता वाटली. तिचा तो अन्तःकरणाचा कळवळा पाहून त्याचें हृदय विरघळलें.

जेवण झाल्यावर एक भला लठ्ठ चिरूट ओढीत तेनेंत इझि-चेअरवर पहुडले. लहान मुलें खेळण्यांत रमून गलीं. फ्लोरा ताज्या दैनिकाचा अंक चाळीत बसली. सिनेमाच्या जाहिरातीची फिरती गाडी वाजत गाजत जात होती. मंद मंद वायुलहरींनीं दारासमोरील पिंपळाचीं पानें सळसळ असा आवाज करीत होतीं. सर्वत्र शांततेचें साम्राज्य पसरलें होतें. इतक्यांत तेनेंतला आपल्या भावाची आठवण झाली. तो म्हणाला,

— फ्लोरा, मावरीस कुठं दिसला नाहीं ?

-- तो अशा वेळीं नाहींच दिसायचा ! आजचा हा दिवस आम्हां साऱ्यांच्या सुखाचा ! पण त्याचा एकट्याचा तेवढा त्रासाचा !

-- कां ?

-- तुम्हीं घरांत असतां म्हणून ! मेल्याच्या मनांत आपल्याला गिळायला घालणाऱ्या भावानें घरांत एका क्षणाचीहि विश्रांति घेऊं नये असंच आहे !

-- पण फ्लोरा, असं त्याचं बिघडलं कुठं ?

मला काय विचारतां ? विचारा तुमच्या लाडक्या भावालाच !_हातांतील वृत्तपत्र फेंकीत ती म्हणाली. त्या वेळचा तिचा तो राग अगदीं स्वाभाविक वाटत होता. एका घटकेपूर्वी आपल्या नवऱ्याशीं अत्यंत लाडुकपणानं मंदमधुर बोलणारी ती ही फ्लोरा नव्हे इतका संशय वाटण्याइतका फरक तिच्या चेहऱ्यांत त्या वेळीं दिसून आला. ती रागानें अगदीं लाल झाली.

—फ्लोरा, अशी रागावून तूं आपली नाजूक प्रकृति अधिकाधिक बिघडवून घेशील ! मी तुला घरीं पाहिजे तो असा रागावून मला बेजार करायला कीं काय ?

-- मी तुमच्यावर कधीं रागावलें आहे का ? माझ्या फुटक्या नशिबाला मी दोष देत आहें झालं !

— असं वैतागण्याइतकं तुझं नशीब खास वाईट नाहीं !

— छे, अगदीं वैभवानं भरलं आहे तें !

-- तसं म्हणू नकोस फ्लोरा ! तेनेंतची जागा कांहीं कमी मानाची किंवा प्राप्तीची खास नाहीं.

— ती मोठी असेल! पण महिन्याची तोंडमिळवणी करतां करतां आज कसा त्रास होतो हें तुम्हींच पहात आहां ना ?

— माझा जॉन पोर्तुगालला शिकून येईपर्यंत जमाखर्चाची अशी ओढाताण व्हायचीच ! तो कोठल्यातरी सरकारी जागेवर नेमला गेला म्हणजे सारं सोन्यासारखं होईल.

— पण ह्या बैलोबानं आम्हाला कांहींच उपयोगी पडूं नये का ? दिवसभर सुतक्यासाखा चेहरा करून...

— तें आपलं नशीब आहे ! ती एक निरुपायाची--आपल्या हाताबाहेरची गोष्ट आहे ! त्याच्याएवढा भाऊ असून कोणत्याही कामाला तो निरुपयोगी ठरावा ही देवाची आम्हांवर अवकृपा आहे. पण असं असलं तरी मावरीसचा आपण कांहीं तरी उपयोग हा करून घेतलाच पाहिजे !

— मावरीसचा अन् उपयोग ? — आश्चर्यातिरेकानें फ्लोरानें विचारलें.

- होय फ्लोरा ! ह्याच मावरीसमुळें आम्हांला धनलाभ व्हावा अशीच योजना मी करणार आहें. -- आणि तीं दोघेंहि केवढा तरी वेळ या अभिनव योजनेसंबंधीं हळुहळू बोलूं लागलीं.

संध्याकाळीं तेनेंतनें मावरीसला हांक मारतांच तो समोर येऊन उभा राहिला. त्याच केंस तेला-पाण्याअभावीं उबले होते. रक्ताशिवाय चेहरा अगदीं निस्तेज दिसत होता. आणि ह्या साऱ्या दैन्याचा उठाव चटकन् भासावा असेच अगदीं मळके--फाटके कपडे त्यानें वापरले होते.

— मावरीस, बस त्या खुर्चीवर !

भावाच्या दृष्टीस आपली दृष्टि न भिडविता मावरीस हळूच बसला. आपली हालचाल किंचितहि भासमान होऊ नये एवढी खबरदारी मावरीस घेत होता. आतां आपला भाऊ आपल्याला कसला तरी बिकट पेंचाचा प्रश्न विचारणार या काल्पनिक भयानें त्याला अगदीं कांपरें भरलें होतें. त्याच्या मुद्रेवर चिंतेची दाट छाया पसरली होती.

— मावरीस !— चिरूटावरील राख झाडीत तेनेंत म्हणाले,

माझ्या सदागुंती व्यवसायामुळें तुला कांहीं विचारायलासुद्धां मला वेळ मिळत नाहीं ! आणि ज्या ज्या वेळीं मी घरीं असतों त्या त्या वेळीं तूं कुठंतरी माझ्या नजरेआड होण्याची खबरदारी घेतोस ! मावरीस, ह्या घरांत तुला परक्यासारखं वाटतं का ?

तेनेंतच्या बोलण्यांत नेहमीचें काठिण्य तर नव्हतेंच उलट कधींहि न अपक्षिलेल्या निर्मल ममतेचा विपुल सांठा होता. आपल्या भावाचे जिव्हाळयानें ओथंबलेले हे मधुर बोल ऐकून मावरीसचें भावसंपन्न मन कृतज्ञतेच्या अन् आदराच्या भावनांनीं उचंबळलें. आणि अशावेळीं आपण कांहीं तरी बोललें पाहिजे याची पुरेपूर जाणीव असूनहि त्याच्या ओठांतून एकहि शब्द बाहेर पडेनासा झाला. त्याची ती गोंधळलेली स्थिति तेनेंतनें केव्हांच ओळखली. पूर्वींपेक्षांहि करुणापूरित दृष्टीनें मावरीसकडे दृष्टिक्षेप करीत गहिंवर-लेल्या स्वरांत ते म्हणाले,--मावरीस, वडिलांच्या मृत्यूसमयीं तूं अवघा पांचच वर्षांचा होतास. पपानें आपल्या मरणसमयीं तुझ्या कृश देहाचा खिळखिळा सांपळा माझ्या स्वाधीन केला आणि त्या वेळे-पासून मी तुझं पालन-पोषण केलं. तुला शिकविण्याचे प्रयत्न मी कांहीं थोडे-थोडके केले नाहींत; पण कमनशिबानें यश आपणापासून दूरच जाऊं लागलें. तुझ्यापासून मी कसल्याच सहाय्याची--आधाराची अपेक्षा बाळगीत नाहीं. तूं तुझी प्रकृति सांभाळून राहिलास तरी मी मोठा आनंद मानीन ! मावरीस, मी तुला कांहीं विचारूं का ?

मावरीसच्या डोळयांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. तशा स्थितींत सागराच्या लाटांप्रमाणें एकामागून एक जास्त जोरानें येणाऱ्या हुंदक्यांची आवराआवर करीत तो म्हणाला, - इरमांव, तुम्हाला

हवं तें विचारा. माझा तुम्हांला काडीचाहि उपयोग होऊं नये एवढंच माझं जीवनसाफल्य दिसतं. इरमांव, तुमचा मी अनंत अपराधी आहें! घरच्या जमाखर्चाच्या ओढाताणींत माझा यत्किंचितहि उपयोग न होतां उलट माझ्या औषधांपायीं विपुल खर्च तुम्हांला करावा लागतो याचं मला अत्यंत दुःख वाटतं.

— तें मनावर घेऊं नकोस! त्यासंबंधीं स्वतःशींच सतत चिंतन करूं लागलास तर त्या औषधांचा उपयोग कांहींच होणार नाहीं! तुझ्या हातच्या का आहेत त्या गोष्टी? पण मला एकाच गोष्टीचें जास्त वाईट वाटतें, ती ही कीं तुजवर जीवाभावाचं प्रेम करूनहि तूं मला परक्याप्रमाणें लेखतोस!

— नाहीं! इरमांव, अशी कुबुद्धि मला केव्हांहि स्पर्शून गेली नाहीं.

— मग तुला फ्लोराचा त्रास होत असावा. ती कितीहि झाली तरी परक्या घरची आहे! रक्ताची माया तिच्यांत कुठली असणार?

— नाहीं! भावजयीचं नांव घेतलं तर मोठं पातक लागेल मला! तिनं जन्मदात्या जननीप्रमाणें मजवर ममता केली आहे.

— मग अगदीं लपून दडून कां राहतोस तूं? माझ्याशीं मनमोकळेपणानं बोलण्याची तुला कां म्हणून भीति वाटावी?

— इरमांव, आठ दिवसांच्या विश्रांतिरहित परिश्रमानंतर आपण अगदीं अल्प वेळ घरीं राहतां. त्या वेळीं माझी ही हीन-दीन दशा पाहून तुम्हांस खेद होऊं नये एवढ्याचसाठीं मी बाजूला राहतों झालं!

— मावरीथ, खरं बोलतोस तूं हें?

– होय ! अगदीं खरं आहे इरमांव !

– मावरीस, तुझ्यासाठीं माझा जीव अगदीं हळहळतो. तूं भोगीत असलेले त्रास माझ्यानें पाहवतसुद्धां नाहींत. मला धाकटा भाऊ असावा अन् त्यानें सारा घरचा कारभार पाहावा ही माझी इच्छा अखेर अपुरीच राहते ! मी मिलिटरी पेशांतला माणूस ! आजच्या युद्धाच्या धामधुमीच्या काळांत आमच्या राष्ट्राला कधीं युद्धभूमीकडे धांव घ्यावी लागेल कळत नाहीं. आणि असं झालं तर...

– तर काय इरमांव ?–अत्यंत अधीरतेनें मावरीसनें प्रश्न केला.

– तर आणखी काय ? आजच्या एकंदर रागरंगावरून सर्वां-आधीं माझी रवानगी होईल असें दिसतं.

– आणि आम्ही ?

– तुम्हां सर्वांना इथंच ठेवणं भाग आहे. तिथं तुम्हांला नेणं धोक्याचं होईल. इथं तुम्हीं सुखा--समाधानानं वागलं पाहिजे. एकाची चूक झाली तर दुसऱ्यानें सुधारली पाहिजे. माझी फ्लोरा स्वभावानें रागीट आहे. ती तुला...

– छे छे !

– छे काय ? ती एखादवेळीं माझ्याशींहि निष्कारण भांडते. ती तुला थोडीच ऐकणार ! म्हणूनच तुझ्या नांवानें कांहीं तरी संग्रह करावा, तुला स्वतः कांहीं तरी आर्थिक आधार असावा असं मला अलिकडे एकसारखें वाटूं लागलें आहे !

– इरमांव, असली दुजेपणाची भावना आपण मुळींच बाळगूं नका ! माझ्यासाठीं स्वतंत्र योजना आणि कसली ?

-- माझ्या मनांत तुझ्या नांवानें पंधरा हजारांची पॉलिसी घ्यावयाची आहे !

-- आपणास त्यासाठीं केवढा मोठा हप्ता द्यावा लागणार ! आणि ते हप्ते आपणालाच भरावे लागणार असल्यानं पॉलिसी तेवढी माझ्या नांवें घेण्यांत कोणतं औचित्य आहे ?

– तूं म्हणतोस तें कांहीं खोटं नाहीं. तुझा विमा म्हणजे माझ्या चालू खर्चांत आणखी वाढच ! पण त्यामुळें तुला हक्काचं कांहीं तरी उत्पन्न केलं हें मला मिळणारं समाधान कांहीं थोडं–थोडकं नाहीं ! शिवाय ठराविक मुदतीचा विमा न उतरवितां तुझ्या कंठांत प्राण असेपर्यंत हप्ते भरण्याचा करार केला म्हणजे त्या मानानं वार्षिक रक्कम अगदींच थोडी होईल.

– पण आजच्या या माझ्या बिनभरंवशाच्या प्रकृतींत कोणती कंपनी माझा विमा स्वीकारणार !

– ती तजवीज करतां येईल झालं !

तिन्ही सांजा झाल्या. नवरा-बायकांच्या जोडया फरूं लागल्या. बाजारहाट करून थकलीं-भागलेलीं कष्टाळू माणसें आपआपल्या घराकडे परतूं लागलीं. तेनेंतहि फ्लोराला घेऊन फिरवयास गेले. बागेच्या कुंपणांत आयांबरोबर मुलें खेळत होतीं. मावरीस व्हरांडयावर बसून जड अंतःकरणानें विचार करीत होता. इरमांव आपल्यासाठीं एवढे त्रास सोसतो, ते जणूं काय थोडे म्हणूनच आपल्या आयुष्याचा विमा उतरविण्यास ते तयार झाले आहेत. आपल्या भावाच्या अंतःकरणांत चढून आलेल्या या रहस्याचें कोडें मावरीसला उलगडलें नाहीं. तो त्याच गोष्टीचा एकसा·

रखा विचार करीत राहिला.

दुसऱ्या दिवशीं ऑफिसांत जाण्यापूर्वी तेनेंतनें मावरीसकडून विम्याचे फार्म भरून घेतले. डॉक्टरकडून तपासणीचा फार्सहि केला आणि विम्यासाठीं मावरीस पास ठरल्याचें समजतांच त्यानें समाधानाचा सुस्कारा सोडला. त्याच्या चेहऱ्यावर हास्यरेषा चमकली.

*

दिवसामागून दिवस जात होते. तेनेंतची बदली कांहीं अन्य ठिकाणीं झाली नव्हती. युद्धाचे ढग जिकडे तिकडे पसरले होते खरे, पण त्याच्या सदाशांत आणि अजातशत्रू राष्ट्राला त्याची झळ कांहींच लागण्यासारखी नव्हती. अलिकडे तेनेंत मावरीसच्या प्रकृतीबद्दल स्वतःच चौकशी करी. त्याची प्रकृति दिवसेंदिवस खंगत चालली होती. त्याला भोगाव्या लागणाऱ्या अनिवार क्लेशांमुळें आपला जीव त्याला नको नकोसा झाला होता. पण अत्यंत दुःख देणारा दांत हलत असतांहि जसा पडत नाहीं तसाच त्याचा आत्मा खालींवर होत असतांहि त्याच्या देहाला सोडीत नव्हता.

तेनेंतच्या विचारपुशींत, आपुलकीच्या भावनेंत वरवर ममतेचा निर्मल झरा आहे असेंच वाटत होतें. पण आज मावरीसचे डोळे उघडण्यासारखा प्रसंग घडला. इरमांवच्या या मायेच्या पोटीं स्वार्थाचें विष आहे अशीच मावरीसची खात्री झाली.

रात्रीचे दोन वाजले होते. सिनेमाचा दुसरा 'शो' संपल्यानंतर तेनेंत फ्लारासह घरीं आले होते. घरांत अगदीं सामसूम होतें. लहान मुलें झोंपून गेलीं होतीं. आयानें दार उघडतांच पती-पत्नी आंत आलीं आणि आपल्या झोंपण्याच्या खोलींत गेलीं.

# शहाळीं

बिचारा मावरीस झोंपेविना तडफडत होता; पण त्याची चौकशी कोण करतो! संसारांतील खडतर तुरुंगवास तो अनुभवीत होता. मायेनें त्याच्याशीं बसून दोन शब्द बोलणारें कोणच नव्हतें. तो शांत चित्तानें आपल्याविषयींच विचार करीत होता.

शेजारच्या खोलींत तेनेंत आणि फ्लोरा बोलत होतीं. त्यांच्या संभाषणांतून एक दोनदां 'मावरीस' हा शद्ब आल्यानें मावरीस लक्ष देऊन त्यांचें संभाषण ऐकूं लागला.

त्यानें तो आवाज ओळखला. त्याचा इरमांव बोलत होता.

— फ्लोरा, विमा कंपनीचं पत्र आलं आहे!

— काय म्हणून?

— आणखी काय? मावरीसच्या पॉलिसीचा हप्ता दहा तारखे पर्यंत भरण्याबद्दल.

— हा हप्ता कितवा?

- हा तेरावा हप्ता! फ्लोरा, साडेसहा वर्षं झालीं त्याची पॉलिसी घेऊन! त्यावेळीं वाटलं होतं...

-- काय वाटलं होतं?

— कीं एखाद्या वर्षाचे दोन हप्तेच तेवढे भरावे लागतील! आतां हा जर असाच जगूं लागला तर मोठीच पंचाईत व्हायची!

— पंचाईत कसली?

-- कसं समजत नाहीं फ्लोरा तुला? ह्याची प्रकृति अशी म्हणून याच्या कंठांत प्राण असेपर्यंत हप्ते भरण्याची पॉलिसी घेतली मीं. एक-दोन हप्ते भरल्यानंतर मावरीस मरणार आणि पंधरा हजार रुपये आपणास अचानक मिळणार म्हणून हा तहाह्यात विमा

उतरला होता. पण मावरीस जर असाच जगूं लागला तर त्याच्या अंतापर्यंत मला हप्ते भरावे लागतील! आणि तसं झालं तर पंधरा हजारांपेक्षांहि जास्त रक्कम आपणास भरावी लागणार!

— याला उपाय कोणता?— फ्लोरानें विचारलें.

त्यानंतर तीं अगदीं हलक्या आवाजांत बोलूं लागल्यानें मावरीसला कांहींच ऐकूं आलें नाहीं. परंतु एकंदर परिस्थितीचा त्याला अर्थबोध मात्र पूर्णपणें झाला. आणि बंधूऋण फेडण्यास आपण काय केलें पाहिजे याचा तो विचार करूं लागला.

*

अन् दुसऱ्याच दिवशीं सकाळीं शेजारच्या विहिरींत मावरीसचें प्रेत तरंगत होतें. आणि कांठावर जमलेल्या माणसांच्या समुदायापुढें तेनेंत व विशेषतः फ्लोरा अश्रू टाळून दुःखप्रदर्शन करीत होतीं!



# कलंकिता !

घरांतून बाहेर पडतांना यल्लम्मानें काढलेले उद्गार अजूनहि माझ्या कानांत घुमतात. ती हंसत हंसत म्हणाली होती, – लेखक आहांत तुम्हीं ! माझ्या दुर्दैवी रहस्यकथेचा फायदा घेऊन एखादी गोष्ट मात्र लिहूं नका ! – आणि तिनें पुनः पुन्हां एवढें बजावून सांगितलें असतांहि, त्या दिवसाची ती चटकदार गोष्ट माझ्यानें कांहीं लिहिल्याशिवाय राहवलं नाहीं.

*

धंद्यानिमित्त वारंवार प्रवासाचे प्रसंग मला येतच असतात; आणि त्यामुळें मी जिथं जाई तें घर आणि ज्यांचा परिचय होई तीं आपलीं माणसं, असंच मला वाटायचं ! एखाद्या गोष्टीचा तात्कालिक परिणाम होण्याइतका मी भावनाप्रधान होतों असंच म्हणाना !

# कलंकिता

या सालच्या माझ्या हुबळीच्या खेपेंत न विसरण्यासारखा एक अद्भुत प्रसंग माझ्या अनुभवास आला.

'मल्लिकार्जुन' थिएटरमधून 'लव्ह परेड'चा पहिला 'शो' पाहून मी परतत होतों. वाटेंत एका जुनाट घराच्या दारांत बसलेल्या एका तरुण बाईनं आशाळू नजरेनं मजकडे पहात मला खुणावलं. पण तें पाहिलं न पाहिल्यासारखा लटका भाव दर्शवीत मी लगबगीनं पाय उचलीत जाऊं लागलों. पण, ती बाई उंबरठ्यावरून फुटपाथ-पर्यंत आली आणि मोठ्या धिटाईनं म्हणाली, – या ना शेठ !

अशी आगंतुकी आरंभून फिरत्या प्रवाशांना फसविणाऱ्या या छांदिष्ट बायांची माहिती मीं कितीदां तरी ऐकली होती. पण आयती संधी लाभत आहे तर, बाह्यतः आरामी वाटणाऱ्या वेश्यांचं जीवन असतं तरी कसं हें प्रत्यक्ष पाहावं म्हणून मी तिच्या मागोमाग त्या घरकुलांत प्रवेशलों. खिशांत फारसे पैसे नव्हते व मनांत विकारी विचारहि नव्हता; म्हणून त्या अपरिचितेच्या घरांत जातांना मला यत्किंचित्‌हि भय वाटलं नाहीं.

तिनं एक नक्षीदार चटई पसरली व मंदमधुर स्मित करीत ती म्हणाली, – अगदींच नवखे दिसतां !

तिच्या आकर्षक हास्याबरोबरच तिच्या दोन्ही नाकपुड्यांवर चमकणाऱ्या चमक्यांचा खेळ मोठा आल्हाददायक वाटत होता. मी बारकाईनें त्या खोलीकडे पाहूं लागलों; आणि त्याहिपेक्षां बारका-ईनं ती माझ्याकडे पाहूं लागली. आपल्या शृंगारसदनांत प्रवेशलेलं प्रत्येक माणूस आपलं भक्ष्य आहे असंच पुरेपूर समजत असल्यानें त्या घडीचा अन् प्राप्तीचा आनंद तिच्या चेहऱ्यावर विलसत

असावा असाच त्या वेळीं मला भास झाला.

मी स्वतः कांहींच बोलत नव्हतों. पण तिनं माझ्याशीं फार फार बोलावं आणि तिच्याशीं मोठ्या खुबीनं संभाषण सुरू ठेवून त्या जातींतील स्त्रियांची विचारसरणी समजून घ्यावी ही तळमळ मला होतीच !

तिनं आपला पानांचा डबा आणला आणि ती पट्ट्या बनवूं लागली. एखादा कुशल गारुडी जसा आपल्या अन्नदात्या नागाची निगा राखतो त्याचप्रमाणं तिनं तो डबा सांभाळला असावा. तो घांसून पुसून असा कांहीं सफाईदार केला होता, कीं जरूर पडली असतां एखाद्या आरशाप्रमाणंच त्याचा उपयोग करावा! तिनं माझ्या हातांत एक पानपट्टी दिली. ती देतांना तिनं अशी कांहीं चलाखी केली कीं, तिच्या मांसल हाताचा मला स्पर्श व्हावा !

माझ्यासारख्या अननुभव्याला स्त्रीचा तो स्पर्श गोड खरा पण कसासाच वाटला.

— आतां तुम्हीं अन्नम् घेतां कीं गरमागरम दोशेच देऊं ? — तिनं मोठ्या अगत्यानं विचारलं. तिच्या प्रत्येक शब्दांत तळमळ होती. आदरातिथ्याच्या पद्धतींत आपुलकीचा भाव कांठोकांठ भरला होता. या व्यावसायिक लोभी स्त्रियांतहि घरंदाज आदर्श गृहिणींचं सौजन्य असावं हें पाहून मी स्तिमित झालों. आमच्या सोबत्यांत 'बोलक्या' म्हणून माझी फार फार ख्याति, पण तूर्त तरी लाजाळूच्या झाडाचीच दशा मला प्राप्त झाली होती. मी घरासमोरील चाळींच्या लहान मोठ्या खोल्या मोजल्या, तिच्या नांवाची पाटी अनेकदां वाचली, घरांतील दिव्यांच्या बत्त्यांची गणती केली,... पण

ती अशा फसवाफसवी प्रकारांना फसणारी थोडीच होती !

— कुठून आलांत ? — तिनं प्रश्न केलाच.

— बेळगांवहून !

— बेळगांवला तर माझी एक मैत्रीण आहे. तिनं तिथं एवढी गडगंज संपत्ति कमावली, कीं आतां बांधण्यांत येणाऱ्या एका नव्या भव्य थिएटरांत तिची भागी आहे !

आणि ती अशा कांहीं खुसखुशीत गोष्टी लाडिकपणें सांगूं लागली कीं, त्यांत मी रमूं लागलों. — आपल्या तनुविक्रयाच्या पेशांत रूप आणि वय यांबरोबरच नशिब...चान्स हवा असतो ! पहिल्यानं भेटलेला यजमान जर स्थिरचित्त आणि उदार असेल तर या धंद्या-सारखा फलदायी, प्रामाणिक आणि अल्पश्रमी धंदा दुसरा नाहींच !— तिच्या या अनुभविक बोलण्यांत मी तितकासा रमलों नाहीं. ती सुंदर होती, तरुण होती आणि कुणाहि कामी पुरुषाचं चित्त वेधूं शकणारी आकर्षकताहि तिच्यांत थोडी नव्हती. पण, तिच्या मुसमुसणाऱ्या तारुण्याचा रस चाखण्याची अघोरी हांव माझ्यांत मुळींच नव्हती. ती जर आपल्या संभाषण चातुर्यानं माझं मनरंजन करती तर माझ्या पुढील ललितकृतींत तिच्याशीं झालेल्या सुखसंवादाचा उप-योग करून मला सहज रसिकरंजन करतां येईल असं माझ्या मनांत होतं.

आतां या घरट्यांतून कोणत्या युक्तीनं बाहेर निघून जावं याचाच मी मनाशीं विचार करीत होतों. गुंतागुंतीच्या जाळ्यांत अचा-नक सांपडलेल्या माशासारखीच माझी अवस्था झाली होती.

— बरं येतों मी ! — असें म्हणत मीं हातांत टोपी घेतली

आणि तिच्या पानांच्या डब्यांत खणकन् एक रुपया टाकला.

— छे छे ! ! असेच चाललां ? — काकुळतीच्या स्वरांत ती म्हणाली.

— मग ?— माझा आवाज कंप पावला होता.

— आल्यासारखे राहा ना आज माझ्या इथं ?

— मी कुठं आलों आहे ? तुम्हींच ओढून आणलंत मला ?

— छे ! असं बोलूं नये ! कोळी नेहमीं माशांचं स्वागत करतोच ! पण मासे येतात ते मात्र स्वतःच्या सुखासाठीं ! कोळ्यांसाठीं नव्हे.

तिनं कुशलतेनं उपयोजिलेली ही उपमा तंतोतंत माझ्या मनांत नुकतीच स्पर्शून गेली होती, वरून ती मला चांगलीच पटली.

इतकं बोलून ती पुन्हां आंत गेली.

खरं म्हटलं तर मी अगदीं पवित्र भावनेनं त्या घरकुलांत प्रवेशलों होतों. तरीहि तेथील मादक आणि शृंगारपूर्ण वातावरण पाहून, माझं निश्चयी मन दगा देईल कीं काय असा माझा मलाच संशय आल्याशिवाय राहिला नाहीं.

यल्लम्मानं पेहरलेलं तें आकाशरंगी पातळ भारी किंमतीचं होतं. त्याची पिंवळी जर्द दीड वीत रुंदीची किनार तिच्या पिंवळसर अंगकांतीशीं खुलून दिसत होती. तिच्या मूळच्या रूपसंपदेंत भर घालण्याच्या पद्धतीनंच तिनं आपल्या विपुल केशसंभाराची व्यवस्थित रचना केली होती. नाकांत चम्‌चम् चमकणाऱ्या चमक्या, कानांत डुलडुल हलणाऱ्या रिंग्स आणि हातांत दोन दोनच कोरीव सुवर्णकंकणं—हाच काय तो तिचा सारा साजशृंगार ! पण तेवढ्यांतच

तिचं लावण्य डोळे भरून पाहण्याचं सुख अनुभवावं असंच वाटे! एखादा भुकेलेला भिकारी अधाशीपणानं जसं भकाभक अन्न पोटांत कोंबतो तसंच तिचं असामान्य लावण्यभांडार माझ्या नेत्रांत सांठविण्याचा मीं सपाटा चालविला होता. आतां तर ती बाहेर येतांना अगदीं नव्या नवलाईचा पोषाख करून आली. पूर्वीपेक्षांहि आठ-दहा वर्षांनीं लहान वाटावी एवढा बदल तिनं आतां आपल्या वेषभूषेंत केला होता.

माझा हेतु, ध्येयें, योजना किती तरी योजनें दूरदूर पळालीं. मी पुरुष आहे आणि आपल्या शिलाची विक्री करण्याकरतां सौंदर्याचा रमणीय बाजार थाटून बसलेली यल्लमा ही एक स्त्री आहे, हा समंजस विचार त्या वेळीं माझ्या मनात आला. तो एकांत मला किती तरी प्रिय वाटला आणि स्त्रीसहवासाची अल्पहि कल्पना नसलेलं माझं भावनाप्रिय नवं नवखं मन उचंबळून आलं. आणि...

तिच्या कोमल हाताला हळूच धरून मीं तिला जवळ ओढली, पण...

तिनं मला एक हिसका दिला आणि किंचित् रोषानं म्हणाली,

– आधीं पैसे काढा अन् मग साऱ्या गोष्टी!

मीं दहांची एक नोट तिच्या हातांत दिली व तिचीं अनेक चुंबनें घेतलीं व तिच्या गळ्याभोंवतीं विळखा घालणार तोंच ती म्हणाली,

– बस्स करा तुमचा चावटपणा! तुमच्या पैशांचा मोबदला मी दिला तुम्हांला. आतां आपण आपल्या घरीं चला! मी बाजारबसवी नाहीं. परिस्थितीमुळं मी वेश्या बनलें. पण मी पवित्र–निष्कलंक आहे!

चला इथून, लवकर पाय उचला ! मला नसत्या मोहांत गुंतवूं नका !

आतांच्या यल्लम्माच्या बोलण्यांत पूर्वीचा नखरा मुळींच नव्हता. पुण्यप्रभावी सतीचा आवेश तिच्यांत आला आहे कीं काय असंच मला वाटलं !

तिच्या ह्या चमत्कारिक बोलण्यानं मी मोठ्या बुचकळ्यांत पडलों. माझें कथालेखकाचं उत्सुक मन तर या तिच्या वर्तनाचा कार्यकारणभाव धुंडाळूं पाहूं लागलें. पण तिनं आपल्या मनःकपाटांत जतन करून ठेवलेल्या रहस्याचा पत्ता मला कसा लागावा ? काय केलं असतां या यल्लम्माची रहस्यकथा मला कळेल हीच विवंचना माझ्या मनाला लागून राहिली. ती तर दरवाजाकडे बोट दाखवून मला बाहेर जाण्यास निश्चयानं सांगत होती. पण, सांडलेलें रहस्य गवसल्याशिवाय मी जाण्यास राजी नव्हतों.

-- जातां कीं नाहीं आपण ?—अधिकारी स्वरांत ती म्हणाली.

— नाहीं !-- तेवढयाच जोरांत मी उत्तरलों.

— नाहीं ?-- मग...

-- मग काय ?-- मी उत्सुकतेनें विचारलें.

-- भय्याला सांगून तुम्हांला हांकलून द्यावं लागेल !

– यल्लम्माबाई, कसला हा विचित्र न्याय ? मी माझ्या बिऱ्हाडीं मुकाट्यानें जात असतां तुम्हीं मला खुणावतां...बोलावतां, नको असलेलें भुरळे वातावरण माझ्यापुढें निर्माण करतां, माझ्या-कडून पैसेहि मागून घेतां आणि त्याच्या मोबदल्यांत मला हांकलून देणार काय ? स्त्रीस्वभावाचा हा विचित्र मासला जर एखाद्या चतुर कादंबरीकारानं जशाचा तसा चित्रित केला तर वाचकवर्ग त्या

बिचाऱ्यावर विश्वासहि ठेवणार नाहीं...मूर्खांत काढतील त्याला !

माझं हें बोलणं तिला रुचलं नसलं तरी पटल्यासारखं दिसलं. कसल्या तरी, विसरण्याचा प्रयत्न करणाऱ्या, प्रसंगाचा चित्रपटच दिसल्यासारखें करीत ती गहिंवरलेल्या आवाजांत म्हणाली,—शेठ, ही यल्लम्मा वेश्या नाहीं !

— तर?

— ती लग्न होऊनहि कुमारी, नवरा असूनहि विधवा आणि बाजारबसव्यांच्या चाळींत राहूनहि पवित्र आहे !— तिनं आपल्या ब्लाउझच्या खिशांतून रेशमी हातरुमाल काढला आणि डोळ्यांतून निघणाऱ्या असंख्य अश्रुधारा पुसल्या. पण, जास्त आग झाली म्हणजे उकळत्या पाण्याला ज्याप्रमाणं अधिकाधिक कढ येतो त्याप्रमाणंच या अप्रिय अशा आठवणीनं तिचे कारुण्यपूर्ण डोळे पुनः पुन्हां भरून येऊं लागले.

त्या प्रसंगीं कसं वागावं हेंच मला कळेनासं झालं.

मीं आर्जवी स्वरांत म्हटलं,—यल्लम्माबाई, आपल्या खिन्न चेहऱ्यावरून आपल्या तीव्र दुःखाची जाणीव मला होऊं शकते. मला आपला बंधू समजा आणि अंतःकरणांत कोंडून ठेवलेल्या आपल्या दुःखाला वाट मोकळी करून द्या !

तरीहि ती उगी होती. आपली रहस्यकथा कथन करण्या· इतका विश्वासपात्र मी तिला कदाचित् दिसलों नसावा.

— यल्लम्माबाई, सुख दुसऱ्याला कथन केलं असतां दुणावतं आणि दुःख कमी होतं, असा सृष्टीचा नियम आहे. आपण आपली रहस्यकथा मला सांगा. माझा तुम्हांविषयींचा गैरसमज दूर होईल.

तिनं आवंढा गिळला. इकडे तिकडे चौफेर नजरफेक केली. आणि ती सांगूं लागली, – महाराज मी वेश्या नाहीं! चांगल्या कुलीन घराण्यांतील कुमारिका आणि एका सधन सज्जनाची सौभाग्यवती आहें! पण, देवतेवर देव कोपला अन् तिचं जीवन कस्पटासमान झालं. पुरुषी अरेरावी सामर्थ्य स्त्रीच्या काल्पनिक रमणीय उद्यानाचं भयंकर वाळवंट कसं करूं शकतं, हें माझ्या कर्मकथेवरून. तुम्हांला स्पष्टपणं कळण्यासारखं आहे!

तिला अडथळा...खोटी होऊं नये म्हणून मी मध्यें प्रश्नोत्तरें करीत नव्हतों, आणि आपल्या हृदय पिळवटून निघणाऱ्या बोलांकडे माझें पूर्ण लक्ष आहे याची खात्री झाल्यानं ती आपली कथा कथीत होती.

– मी साधारण सुशिक्षित आहें. माझ्या बाबांनीं आपल्या ऐपतीपलिकडे खर्च करून मला चांगल्या ठिकाणीं दिली. माझे पती म्हणजे फार सज्जन, हळुवार अंत:करणाचे, दयाळू व स्वरूप-संपन्न गृहस्थ!

– लग्न होऊन सोळाव्या दिवशींच माझ्या आयुष्याचा भाग्य-क्षण ठरविला होता आणि त्या क्षणाला मला माझ्या पतीदेवांच्या अंत:स्वभावाचं दर्शन घडणार होतं. माझ्या उचंबळलेल्या मन:साग-रांत आनंदाचं तुफान माजलं होतं व डोळ्यांचे दिवे करून मी त्या सुखक्षणाची अधीरतेनें वाट पहात होतें. पण तोच क्षण माझ्या दु:खाचा ठरला! माझ्या जीवनसंसाराचं स्मशान बनविणारा...मला माणसांतून उठविणारा अनर्थकारक दिवस ठरला!–ती रडूं लागली. तिला आपला दु:खावेग आवरतां येईनासा झाला.

— पण झालं तरी काय असं ?

'जरा थांबा!' अशा अर्थानं आपला हात दाखवीत ती पुन्हां सांगूं लागली, — आम्हां दोघांची ज्या वेळीं भेट झाली त्या वेळीं रोषपूर्ण स्वरांत ते म्हणाले, 'यल्लम्मा, या घरांत माझी पत्नी म्हणून तुला माझ्यानं ठेवून घेतां येणार नाहीं. तूं उद्यां तुझ्या माहेरीं जा व पुढील आयुष्य कसं घालवायं याचा पूर्ण विचार कर!' उन्हानं काया करपत आहे म्हणून वडा-पिंपळाच्या झाडाखालीं छायेसाठीं बसावं आणि तें प्रचंड झाडच पडून त्याखालील माणसाचा कपाळमोक्ष व्हावा तशीच तिकडचे हे कटु बोल ऐकून माझी दशा झाली. केवढ्या आशेनं नवतरुणी पतीच्या पहिल्या भेटीची अपेक्षा करते ! आणि अनेक गोड स्मृति सांठविलेल्या मजसारख्या नवतरुणीला वरील प्रकारचं बोलणं ऐकणं म्हणजे कोण प्रसंग ? तुम्हींच कल्पना करा !

— पण तुम्हीं त्यांच्या रोषाचं कारण नाहीं का विचारलं ?

— नाहीं कसं ? मीं खोदखोदून विचारलं त्या वेळीं त्यांनीं एक खोडसाळ पत्र माझ्यावर फेंकून ते त्यांच्या दृष्टीनं आपल्या जबाबदारींतून मोकळे झाले.

— त्या पत्रांत असं होतं तरी काय अन् तें कुणी लिहिलं होतं ? — मी अधीरतेनें विचारलें.

— तें पत्र लिहिणाऱ्याचें नांव अज्ञातच होतं. पण तें मला लिहिलें होतें. त्या पुरुष पत्रलेखकानं जणूं काय आपली व माझी बालपणापासून दाट ओळख आहे व यांच्याबरोबर झालेल्या लग्नाबद्दल मी हळहळतें आहे म्हणून त्या पत्रात उल्लेख करून माझी

समजूत केली होती. दोन दिवसांपूर्वीच मीं त्याला पत्र पाठवून बोलावलें व गुजगोष्टी केल्या. असें लटकें वर्णनहि त्यानें एखाद्या कादंबरीकाराप्रमाणेंच केलं होतं. हें त्याचं लिहिणं अगदीं खोटं, पण इकडे मलाच खोटी ठरवूं लागले!

– पण असा हा दुष्ट नरराक्षस कोण असेल? दुसऱ्याच्या सुखाच्या संसारांत माती कालविणारा हा पशू!

– कशाला उगीच संतापतां तुम्ही! असले राक्षस आमच्या हिंदुसमाजांत अनेक आहेत. माझी इच्छा धरणाऱ्या एखाद्या चंचल भ्रमरानेंच त बनावट पत्र लिहिलें व मीं त्याचा जो अव्हेर केला होता त्याबद्दल अशा पद्धतीनें सूड उगवला.

– एवढ्या एका खोडसाळ अन् बनावट चिठोऱ्यावर विसंबून तुमच्या सुशिक्षित नवऱ्यानें तुम्हाला घराबाहेर घालवून द्यावें! खरोखर फारच आश्चर्याची अन् अविचाराची गोष्ट आहे ही!

– हा आपला अंदाज अगदीं योग्य आहे. त्यांच्या मनांत लग्नदिवसापासून मजविषयीं किल्मिष वास करीत होतेंच!

– त्याचं कारण?

– आमची घरभरणी झाल्यावर वैदिक चालीरितीनुसार आमच्या शय्या अर्थातच पृथक पृथक खोलींत घालण्यांत येत होत्या. त्यांच्या हावऱ्या मनांत काय, कीं त्या दिवसापासूनच त्यांच्याशीं सहशयन करावं! दिवसा एकांतांत गांठून त्यांनीं त्या सबंध पंधरवडाभर माझ्यामागं एकसारखा ससेमिरा लावायचा! त्यांना मीं किती तरी तऱ्हांनीं पदोपदीं विनवलं, कीं मी आतां आपलीच कीं नाहीं! आणखी अवघ्या थोड्याच दिवसांचा अवधी, मग

धार्मिक पद्धतीनुसार या सगळ्या गोष्टी आपल्या मनाप्रमाणानं पार पडतीलच! तथापि माझ्या या विनवण्यांचा त्यांच्या मनावर परिणाम होत नव्हतासा दिसल. शिवाय असं पहा! घरांत वडीलधारीं—सनातनी वृत्तीचीं माणसं असतांना त्यांच्या दृष्टीनं धर्मबाह्य ठरलेल्या या गोष्टी करणं म्हणजे भयंकर गुन्हाच नव्हे का? आम्ही स्त्रिया कितीहि सुशिक्षित असलों तरी त्यांना स्वाभाविक विनय सोडतां येत नाहीं! याशिवाय आणखीं एक क्षुल्लक गोष्ट घडली. ते जेवलेल्या ताटांत सासूबाईंनीं मला वाढलं. पण त्या उष्टया ताटांत जेवायचं मीं नाकारलं. नवऱ्याच्या ताटांत न जेवण्याचा बंडखोरपणा केल्याबद्दल माझ्या घरांत व त्या गांवांत माझी ख्याति झाली. या दोन क्षुल्लक कारणानं माझं मन त्यांच्यावर नसावं, असाच तिकडे समज झाला आणि त्यांत त्या पत्राची भर पडल्यानं मी स्वैरवर्तनी बेदरकार ठरलें.

— मी पुष्कळ विनवण्या केल्या. देवाधर्माची शपथ घेतली, पण त्यांनीं माझं कांहीं सुद्धां ऐकून घेतलं नाहीं. नाहीं नाहीं तीं जीवघेणीं बोलणीं मला ऐकून घ्यावीं लागलीं. खुलासा करण्यासाठीं म्हणून तोंड उघडावं तोंच तें त्यांना माझ्या बिनमुर्वतखोरपणाचं आणखी एक प्रत्यंतर मिळावं. त्यांनीं मला जवळजवळ ढकलूनच आपल्या खोलीबाहेर काढलं.

— त्या दिवसानंतर मीं बऱ्याच ठिकाणीं नोकरीसाठीं राहिलें, पण मला भेटलेले सावकार सच्चे नव्हते. माझं शील राखणं कठीण होऊं लागल्यानं मी तो मार्ग सोडून दिला व गेल्या सहा वर्षांपासून या एकाच जाग्यावर आहें.

— असाच कुणाला तरी महिन्यांतून एकदां गांठतें, त्याज-कडून खर्चापुरते पैसे उपटतें व त्याला हांकलून देण्याचा हरामपणा करतें. पावित्र्यानं दिवस काढूनहि लोक मला कलंकिता म्हणतात! त्यांचा तरी काय दोष?

तिची ही करुण कैफियत ऐकून माझ्याजवळची आणखी एक दहांची नोट काढून, आजच्या या चमत्कारिक पण संस्मरणीय प्रसंगादाखल, केवळ भाऊबिजेच्या ओवाळणीसमान मीं तिच्या पुढ्यांत टाकली आणि सानुकंप अंतःकरणानें त्या पवित्र कलंकितेचा निरोप घेतला. पण त्या कलंकाची बोंचणी अन्तरीं चांगलीच झोंबली.



# कवि आणि कोकिळा

अरविंदनें गोद्रेजच्या सुवासिक साबणानें आपलें तोंड धुतलें व तो युरोपियन धर्तीचा उंची पोषाख करूं लागला. त्याच्याकडे चमत्कारिक नजरेनं पाहात अंजनी म्हणाली,–असे एवढ्या रात्रीं कुठं?

– सुरंगीच्या इथं जाऊन येतों जरा!

– पण अशा रात्रीच्या वेळीं बाहेर जाणं बरं का?

– कां?

– शेजारी काय म्हणतात तें आहे का ठाऊक?

– म्हणेनात कांहीं तरी! आपलं आचरण शुद्ध असलं म्हणजे अशा भुंकणाऱ्या कुत्र्यांकडे लक्ष्य द्यायची जरूरीच नसते. अंजनी, गिरगांवहून दादरपर्यंत असे हे खेटे जे मी आज पंधरा दिवस सतत

एकसारखे घालतों त्यांतील माझा हेतू मी तुझ्यापासून लपवून ठेवला नाहीं. असं असतां, पुनः पुन्हां लोकांच्या भकण्याकडे माझं लक्ष्य तूं काय म्हणून वेधावं हेंच मला कळेनासं झालं आहे. एकदां सुरंगीच्या गळ्यांतून माझी कविता रेकॉर्डवर आली म्हणजे तिच्या माडीचा जिना कांहीं मला पुन्हां चढायला नको !

— तिच्या गोड गळ्यावर लुब्ध होऊन तुमची कविता गाऊन घेण्यासाठीं म्हणून तुम्ही तिथं जातां खरे, पण अखेर स्वतःचा गळा तिच्या हातांत द्याल अशी मला भीति वाटते !

— छे, छे ! ! भलतंच कांहींतरी !

— भलतं कसं ? ती नटी आहे म्हणून मी ऐकतें आणि नटींची जात पुरुषांना मोहवश करून घेण्यांत मोठी चतुर असते. ह्याचीच भीति वाटते मला ! — किंचित् केविलवाण्या स्वरांत अंजनी म्हणाली.

— अंजनी, इतकीच का तूं माझ्या हृदयाची पारख केलीस ? तुजसारखी मनपसंत लावण्यवती पत्नी लाभल्यावर परस्त्रीचा मोह उत्पन्न होणं कधीं तरी शक्य आहे का ?

— इतकं हरभऱ्याच्या झाडावर चढवायला नको कांहीं !

— बरं, तें असूं दे ! जातों मी आतां ! — असें सांगून अरविंद बाहेर पडला व सहा नंबरची ट्राम गांठून दादरला गेला.

दादरला जेष्ठाराम बागेंत सुरंगी एका ब्लॉकमध्यें रहात होती. तारुण्यांत आल्यावर तिनें आपल्या पिढीजाद धंद्यास कांहीं काळ वाहून घेतलें होतें. पण गेल्या पांच वर्षांपूर्वी मुंबईच्या सोमनाथ

# कवि आणि कोकिळा

शेठजींचें सदाशिवगडला आगमन घडलें आणि तिच्या असामान्य रूपसंपदेवर फिदा होऊन त्यांनीं तिला मुंबईला आणली. कारवारचा किनारा आणि वेश्यावृत्ति हीं दोन्हीहि सुरंगीनें बरोबरच सोडलीं असें म्हटलें तरी चालेल.

शेठजींनीं तिला स्वतःच्या पत्नीप्रमाणेंच वागविलें आणि त्यांच्या ह्या सौजन्यास साजेल असेंच सुरंगीनें आपलें वर्तन चोख ठेवलें. त्या बागेंतील लोक तर तिला खुद्द शेठाणीच म्हणून ओळखीत. शेठजींच्या सान्निध्यांत सफाईनें गुजराथी बोलण्यास ती शिकली होती आणि यामुळें तिच्या जातीचा भेदहि इतरांस कळून येत नव्हता. मुंबईतील पांच वर्षांची राहणी तिला कितीतरी उपकारक आणि फलदायक ठरली. मूळची तिची नाकसुरी कारवारी बोली लोप पावून तिची जागा आतां सुंदर मराठीनें घेतली होती. तिच्या गोड गळ्याला संगीतशास्त्राची बैठक लाभल्यानें तिचें गायन म्हणजे सुखपर्वणीच असें मुंबईकर रसिकांना वाटे. तिच्या गायनाचे कार्यक्रम रेडियोंत अधून मधून होत व तिच्या निवडक चिजांचे रेकॉर्डस् प्रख्यात ग्रामोफोन कंपन्या घेत. हे सर्व व्याप आवड अन् हौस म्हणूनच ती करी. या कलात्मक व्यवसायांपासून अर्थोत्पादन करण्याची तिला जरूरी होती अशांतली गोष्ट मुळींच नव्हती. मात्र, कलेची सेवा करतां करतां स्वतःची मनःशांति नष्ट होईल कीं काय अशी तिला आतांशा भीति वाटूं लागली. दररोज कुणी ना कुणी तिच्या घरीं आला नाहीं असें क्वचितच घडे. या येणाऱ्या लोकांत ग्रामोफोन कंपन्यांचे चालक, होतकरू कवी व गुजराथी–मराठी वृत्तपत्रांचे संपादक उपसंपादक यांचाच भरणा विशेष असे. तिचा

हा व्याप सोमनाथ शेटजींना मुळीच तापदायक भासत नसे. कारण, ते जे सकाळीं दाणाबंदरला जात ते रात्रौ जेष्ठाराम बागेंत परत येत. त्यांचा तेथील वेळ तर शेंगदाणा, अळशी, कापूस यांच्या भावाच्या आंकड्यांशीं खेळण्यांतच रमून जाई! शिवाय घरीं आल्यावरहि ते टेलिफोनशीं – भाव वधारे छे? सूं? वद्धू छे! कबाला करवानू जोय्ये? – अशीं प्रश्नोत्तरें रात्रौ बारा वाजेपर्यंत चालू ठेवीत. त्यांच्या त्या टेलिफोनशीं चाललेल्या व्यावहारिक 'गुजगोष्टी' ऐकतांना सुरंगीला हेवा वाटे. ती कधी कधीं विनोदानें म्हणायची, – शेठ, ती टेलिफोन मला माझी सवतच वाटते! माझ्या ऐवजीं तुम्हीं टेलिफोनशीं लग्न कां केलें नाहीं कोणास ठाऊक? – आणि हा तिचा विनोद ऐकून सोमनाथ शेठजी इतके हंसत कीं त्यांचें अवाढव्य पोट सावरतां सावरतां त्यांना पुरेवाट होई.

आज अरविंद आला त्यावेळीं सुरंगी गुजराथी "प्रताप" साप्ताहिकमधील 'समाजनो अग्निकुंड' ही लेखमाला वाचण्यांत गढून गेली होती. अरविंदच्या पावलांची चाहूल लागतांच ती चटकन् उठली व मंदस्मित करीत म्हणाली, – अरविंदराव, योग्य वेळीं आलांत तुम्ही! आतांच 'वर्ल्ड ग्रामोफोन कंपनी'चे जगाभाई इथं येऊन गेले!

– काय म्हणाले ते? – अधीरांतःकरणानें अरविंद विचारूं लागला.

– कोंकणच्या एका कवीची एक कविता त्यांनीं मला गावयाला सांगितलं आहे, आणि त्याच रेकॉर्डच्या दुसऱ्या बाजूनं तुमची घेतों असं आश्वासन त्यांनीं मला दिलें आहे.

— छान ! मग आमचं काम होणार म्हणायचं तर !

— आणखी काय करणार ? तुमचं गेला पंधरवडाभर एकसारखं दुमणं लागलं आहे ना माझ्यामागं ? म्हणून जगाभाईकडे शब्द टाकला आणि तो मान्यहि केला !

— तुमचा शब्द तो ! ते अमान्य करतील कसे ? पण, सुरंगीबाई, ते कोंकणचे कवि कोण तें कळेल का मला ?

— न कळायला काय झालं ? त्यांची कविताच घ्या कीं ! — असें म्हणून ड्रावरांतून तिनें एक कविता काढून ती अरविंदकडे दिली.

ती पुरती वाचण्यापूर्वी अरविंद म्हणाला, — सुरंगीबाई, माझी कविता कुठं आणि ही कुठं ? कुठं सुरंगीबाईचं सुरेल गाणं नी कुठं त्या आवडाबाईचा गिरणभोंगा ? शब्दमाधुर्य, कल्पनेची भरारी आणि काव्यमय वातावरण यांच्या अभावामुळें ही कविता अत्यंत हलक्या प्रतीची झाली आहे ! — अरविंद त्या कवीची मनसोक्त निंदा करण्याचं सुख आणखीहि अनुभवणार होता; पण मध्येंच सुरंगी म्हणाली, — अरविंराव, द्या पाहूं तुमची कविता माझ्याकडे ! म्हणजे ठरल्याप्रमाणें उद्यां कोर्टात जाऊन दोन्हीहि ध्वनिमुद्रित करून येतें.

अरविंदनें बदामी कागदावर लिहिलेली आपली कविता सुरंगीकडे दिलीच, शिवाय आपला एक कार्डसाईजचा फोटो तिच्या हातांत देतांना अरविंद हळूच म्हणाला, — सुरंगीबाई, तुम्हीं केलंत तर माझं हें काम सुद्धां होण्यासारखं आहे !

— काय तें ?

– कृपा करून हा माझा फोटो रेकॉर्डच्या कव्हरवर व कंपनीच्या कॅटलॉगमध्यें येईल अशी सोय करा. तुमचे उपकार मी कध्धीं कध्धीं नाहीं विसरायचा!

– पण अरविंदराव, तुम्हांला कसं समजत नाहीं? रेकॉर्ड गायकाचा फोटो देण्याचा कंपनीचा शिरस्ता आहे, कवीचा नव्हे! –हंसत हंसत सुरंगी म्हणाली.

– बरं! ही कविता मात्र आणा रेकॉर्डवर एकदांची!–असें पुनः पुन्हां विनवून अरविंदनें तिचा निरोप घेतला व तो गिरगांवला परतला.

+

'वर्ल्ड ग्रामोफोन कंपनी'नें रेकॉर्ड तयार केला व ऑक्टोबर रिलीझ म्हणून विक्रीस मांडला. पण नेहमीं विविध व्यापाच्या तापांत असलेल्या जगाभाईंनीं एक चूक केली. अरविंदच्या रेकॉर्डवर त्यानीं कोंकणचे कवि श्रीयुत रमेश जोग यांचें नांव छापलें आणि अर्थातच जोगांच्या कवितेवर अरविंदचें नांव पडलें.

रेकॉर्डस् भराभर खपत होते आणि कविता कुणाच्या ह्याचा पत्ताही कुणाला नव्हता. गाणाऱ्या बाईची गानकुशलता आणि स्वर-माधुर्य यामुळेंच तडाखेबंद विक्री सुरूं होती. पण दोघेहि कवि विक्रीचें सारें श्रेय आपापल्या काव्यप्रतिभेकडे ओढून घेत होते. अरविंदला वाटे, नांवाच्या चुकीमुळें आपली सुंदर कविता जोगांच्या नांवावर खपत असून त्यांच्या रद्दड कवितेवर आपलें नांव पडल्यानें काव्यक्षेत्रांतील आपला थोर दर्जा कमी होणार आहे.

रमेश जोगहि अशाच विचारसरणीस बळी पडला होता. प्रत्येकाचें मत आपण उच्च प्रतीचे कवि आहोंत असेंच होतें. म्हणून अरविंदनें नांव छापण्यांत झालेली चुक वृत्तपत्रांतून जाहीर केली आणि बी. नं. ३१३३ 'सखे तव मधु बल' ह्या लोकप्रिय भावगीताचे जनक आपण असें जाहीर केलें.

रेकॉर्ड विकत घेणाऱ्यांना याचा कांहींच पत्ता नव्हता. काव्य समजून घ्यायला त्यांना बाजारांत कवितासंग्रह पुष्कळ होते. फोनो-ग्राफ घेणारे केव्हांहि गोड गाण्याचे भोक्ते असतात, अर्थपूर्ण काव्याचे नव्हत, याचा दोघांही कविब्रुवांना विसर पडला होता.

पण ज्या वेळीं अरविंदचा खुलासा जगाभाई व वर्ल्ड ग्रामो-फोन कंपनीचे मालक पेस्तनजी दारुवाला यांनीं वाचला त्यावेळीं त्यांना नांवाच्या अदलाबदलीची चूक कळून आली आणि गैर-समजुतीचें दुरीकरण करण्यासाठीं त्यांनीं खालील खुलासा ओबड-धोबड गुजराथीमिश्र मराठींत लिहून "रणगर्जना" पत्राकडे पाठविला.--

रा. रा. तंत्री "रणजर्जना" यांसी—

जयगोपाळ. तुमच्या छाप्याच्या दिवाळी अंकांत खालील खुलासा प्रकाशित करावा.

"ऑक्टोबर रिलिज बी नं. ३१३३ 'सखे तव मधु बोल' ही चीज मिस्टर अरविंदभाई गोखले यांचो असून बी. नं. ३१३४ 'झोंप सोनुल्या जरा' हें भावगीत भाई रमेश जोग यांचें आहे. आमच्या नजरचुकीमुळें नांवांचा बदल सदरहू रेकॉर्डमध्यें होऊन

समदा गोंठाळा घडला. पण आम्हीं ज्या ह्या दोन कविता रेकॉर्डिंग केल्या त्या केवळ चांगल्या कविता म्हणून मुळींच नव्हे. काव्याची अगर कवींची आम्हाला मुळींच किंमत नाहीं. आमचा लय लोभ आहे तो सुरंगबायवर. तिचा गळा आम्हांला गोड वाटतो, आमच्या हजारों गिऱ्हाईकानाबी वाटतो, म्हणूनच आम्हीं त्यांना परत परत चानस देते, तरी कवीमहाशयांनीं आपल्या काव्याविषयीं भलताच गैरसमज करून घेऊं नये."



# रंगीत संसार

अंगणांत पोचतांच मी म्हटलें,– ममता, आज आणली नाहीं मी तुला फुलाची वेणी !

– नसेना ! तिचं काय एवढं मोठंसं. उद्यां आणतां येईल झालं !– अगदीं हंसऱ्या चेहऱ्यानें ती उत्तरली.

मी लगबगीनें कपडे उतरले. आंत जाऊन हात पाय धुऊन घेतले आणि टॉवेलच्या पदरटोंकानें वारा घेत खुर्चीवर पहुडलों. ममतेनें चहा-फराळाचं आणून माझ्या पुढील तिपायी स्टूलवर ठेवलें व ती दाराजवळ उभी राहिली. ताटलींतील चिमुटभर चिवडा तोंडांत टाकीत मीं म्हटलें,–ममता, नाहींच ठाऊक तुला हे खाण्याचे पदार्थ बनविण्याची पद्धत; नाहीं तर लोकांच्या बायकांनीं केलेले पदार्थ इतके चटकदार असतात कीं ते कितीहि खाल्ले तरी अधिकाधिक खाण्याचा मोह कांहीं आवरत नाहीं !

मी हें मनापासून बोलत होतों थोडाच! पण ममतेला तें अगदीं खरेंच वाटलें. ती किंचित् दुःखित स्वरांत म्हणाली,–माझ्या लहानपणीं गृहकामांत लक्ष घालायला माझी आई मला पदोपदीं सांगत होती; पण मी कसली खोडकर स्वभावाची ?

तिनें एक खोल निश्वास सोडला तो मला ऐकूं आल्याशिवाय कसा राहील ?

– वेडीच तूं! नाहीं तर काय ? तुला एवढं वाईट वाटावं म्हणून का मी बोललों ? अशी अगदीं साधीभोळी कशी तूं ?

– भोळी म्हणजे ? माझा स्वभावच मुळीं तसा. त्याला मी काय करूं ? स्वभावाला कुठं औषध असतं का ?

– ममता, तुला माहीत आहे, मी नेहमीं असं कां बोलतों तें ?

– कां बरं बोलायचं असं घडीघडी ?

– तूंच सांग पाहूं ?

किंचित् विचार केल्यासारखी मुद्रा करून ममता म्हणाली, –मला नाहीं सांगतां येत !

– लाज नाहीं वाटत असं म्हणायला ?

– आपल्या माणसाशीं अज्ञान कबूल करायला लाज कसली ?

– पण असा हा भोळेपणा खुलेपणा सतत सांभाळूं लागलीस तर आपलं आपलं म्हणून अभिमानानं म्हणणारं माणूस मात्र गमावून बसशील ?

माझ्या या वाक्यानें तिच्या मनावर मोठा परिणाम केला. तिनें हुंदक्यावर हुंदके दिले आणि ती अत्यंत दुःखी कष्टी झाली. ती समजुतदार खरी; पण कांहीं केल्या तिची समजूत होईना. म्हणून तिला तशीच तिथं सोडून मी ओटीवर चटई पसरून एक पुस्तक चाळीत बसलों.

+

मला धूर्त स्वभावाची बायको पाहिजे होती. जिच्यापुढें एखादा खोटा शब्द बोललों असतां तो पचविणं मोठं कठीण व्हावं अशी स्वभावपारखी बायको मिळावी अशा अभिरुचीचा मी! पण ममतेचा स्वभाव माझ्या आकांक्षा भंगण्यास साह्यकारक होण्याच्या धर्तीचा. मी कितीहि असत्य बोललों तरी तें अगदीं ब्रीदवाक्य असं समजून चालणारी ममता. अशा भोळ्या-भाबड्या बायकोशीं वागतांना माझ्या जीवाचा अगदीं कोंडमारा होई. आमच्या स्वभावांतील ही टळक भेदरेषा आमच्या आनंदाभ्यासांत कमतरता उत्पन्न करीत होती. माझ्या साध्यासुध्या मनोभावनाहि ममतेला ओळखतां येत नव्हत्या. मग माझ्या बोलण्यातील खाचाखोंचा, वागण्यांतील डावपेंच हें ओळखण्याची तारतम्यबुद्धि तिच्यांत नसल्यास काय नवल?

गेल्या दोन वर्षांत तिच्या स्वभावात योग्य तो पालट व्हावा म्हणून मी किती तरी प्रयत्न केले; पण माझ्या शिकवणीचें वळण कांहीं तिला लागत नव्हतें. कुत्र्याची शेपटी नळींत घालून नीट बसविली तरी ती जशी आपल्या मूळच्या वाकड्या वळणावर जाते तसेंच ममतेला तडफदार रीत्या वागण्याचा धडा दिला तरी ती

आपल्या मुळमुळीत स्वभावाला सोडीत नव्हती. पण तिच्या स्वभावांतील या दोषाबद्दल मी तिला अन्यायी ठरवूं शकत नाहीं. तिच्या बालपणांतील वागण्याचा तिच्या आयुष्यावर झालेला हा दुष्परिणाम होता. मी मुळचा गोव्याकडचाच. पण माझं सारं आयुष्य मुंबईसारख्या, दुनियेशीं बेमुर्वतपणें वागणाऱ्या शहरांत गेल्यानें माझे विचार—वागणूक सुधारक धाटणीची बनली होती. ममतेचें तसं कुठं होतं ? तिचं बालपण गोव्याच्या गर्भश्रीमंत एकत्र कुटुंबपद्धतीच्या घराण्यांत गेलें होतें. तिच्या घरच्या त्या नामधारी एकत्र कुटुंबपद्धतींत नवरा-बायको एकत्र आलेलीं, वादविवाद करीत असलेलीं तिनं पाहिलींच नव्हतीं. त्यामुळें माझ्या उघड वागणुकीनें ती भेदरून जात असे. थोडयाशा सरावानें ती थोडेंसे बोलण्यास शिकली होती. त्यांत माझं समाधान होण्याइतकी विवादकुशलता किंवा मार्मिकता कुठून असणार ? ती जें माझ्याशीं अगदीं थोडं बोले त्याबद्दल तिचें तिला फारफार कौतुक वाटे. अशक्त आजारी मुलगा हात सोडला असतां उभा राहिला म्हणजे आपल्या आईकडे ज्या अभिमानानें पाहत असतो त्याच प्रकारचा अभिमान संभाषणांत अल्पसा भाग घेतल्यावर ममतेला होई. त्यावेळीं ती मजकडे अशा दृष्टीनें पाही कीं, “ तुमच्या शिकवणीचें मी थोडंफार सार्थक करतेंच कीं नाहीं ? ” असा त्या मूकदृष्टींत अर्थ सांठलेला दिसे. तिच्या दृष्टीनें तिचें वागणें बरोबर होतें. पण माझ्या कल्पनेनें ज्या प्रकारची जिवंत अर्धांगी मी चित्रित केली होती तिच्याशीं तुलना करतां ममता फिकीच पडे. तिचें स्वातंत्र्याची जाणीव नसलेलें, व्यक्तित्वाची हाव नसलेलें वागणें माझ्या महत्त्वाकांक्षांचा खून करण्याजोगें होतें. मी

कितीही रागावलों तरी ती मंदहास्य करी. मी तिच्यावर केवढेहि आरोप केले तरी ती रागावत नसे. जणुं काय एक मृत विचारांची स्त्री अशीच तिची वर्तणूक होती. अशा बायकोपासून मजसारख्या जिवंत हृदयाच्या रसिकाचें आत्मरंजन कसें व्हावें ?

तिला चिडवावी म्हणून मी केवढे केवढे प्रयत्न करीत होतों. पण ती अगदीं तटस्थ. एकदां तिला मी स्पष्टपणें रागावण्याबद्दल सांगितलें, त्यावेळीं ती म्हणाली,–कुणी न ऐकलेली, कुणाला न आवडणारी अगदींच कशी ही तुमची इच्छा !

– अग तसं नव्हे ! तुला इतक्यात नाहीं समजायचं तें ! रुसण्या-फुगण्याचे तुफानी प्रसग वारंवार आल्याशिवाय तरुण-तरुणींच्या संसारांत रंग तो कसला ? तुझं हें साध्वीतुल्य वर्तन माझ्या पसंतीचं नाहीच मुळीं ! यांत मला सुखलाभ नाहीं. माझ्यावर तूं रुसण्यास शिकलं पाहिजे. एखाद्या गोष्टीसाठीं हट्ट धरून बसलं पाहिजे !

– काय काय म्हणून ऐकायचं ? माझ्या रुसण्यानं आनंद होईल तुम्हांला ? सांगा तरी ?

– हो ! हो ! कां नाहीं होणार ? तुझ्या लटक्या रागामुळें सुद्धां मी संतोष पावेन.

नवऱ्याला सुखविणें हेंच आपलें परम कर्तव्य समजणाऱ्या ममतेनं एखाद्या अभिनयकुशल नटीप्रमाणें लटक्या रागाचा भाव आपल्या निर्विकार चेहऱ्यावर आणण्याचा प्रयत्न केला आणि तिचें तें फसवें रुसणें त्या घटकेपुरतें मला हसविण्यास पुरेसें झालें.

स्वतःच्या स्वभावधर्माविरुद्ध नाटकांतून तात्पुरती भूमिका वठविणेंसुद्धां केवढें कठीण ? पण ममतेच्या माझ्या प्रेमसंपादनासाठीं तिच्या आवडीविरुद्धच वागण्याचे प्रसंग येत. तिच्या स्वरूपसंपदे-बद्दल मला आदर वाटत होता, सुस्वभावाबद्दल अभिमान वाटत होता. एवढेंहि असलें तरी तिच्या कोमल मनोभावना दुखावतील अशी वागणूक माझ्या हातून हरघडीं झाल्याशिवाय राहत नसे.

+

आज तर मी अगदीं आनंदानें बेहोष झालों होतों. माझ्या 'साफल्य' ह्या कादंबरीचा प्रकाशदिन असूनहि पुस्तकाची एकहि प्रत शिल्लक राहिली नव्हती. मला लाभलेल्या या असामान्य लोकप्रियतेबद्दल मित्रांकडून प्रोत्साहनपर पत्रें व तारा येत होत्या. या आनंदरसांत अधिक माधुरी निर्माण करून आजचा दिवस पूर्ण सुखांत घालवावा, म्हणून मी माझ्या कल्पनेनें एक मनोवेधक चित्र रेखाटलें व त्याची पूर्तता करण्यासाठीं आज ऑफिसांतून लवकरच घरीं आलों. माझा हा उताला येणारा आनंद ममतेला ओळखावयाला कुठं येत होता ?

मी म्हटलें,– ममता, ओळख पाहूं हें काय तें ?

मी खिशांतील कागदाचे लाल रंगी दोन कपटे ममतेला दाख-विले. तिनें ते आलटूनपालटून पाहिले, पण अक्षरांच्या परिचयाभावीं तिला त्यापासून बोध तो काय होणार ?

– नाहींना वाचतां येत ? – एक खोल सुस्कारा सोडीत मी मनांतल्या मनांत पुटपुटलों,– नशीब माझें ! आणि तीं नाटकाचीं

तिकिटें असल्याचें मी ममतेला सांगितलें. माझ्या रसिक मनानें आपण होऊन ममतेनें नाट्यप्रयोगाला येण्याचा हट्ट धरावा असें रमणीय कल्पनाचित्र आपल्या मनःपटलावर रंगविलें होतें, पण बायका आणि नवऱ्याच्या सोबतीनें नाटकाला जातात हें ममतेला खरेंच वाटेना.

– दोन तिकिटें कां घेतलीं आहेत ? सांगशील का ?

– एखादा मित्र येणार असेल झालं ! होय ना ?

– छे ! छे ! तसल्या मित्रांना नेणारा मी नाहीं. आज एका जिवलग जन्मसोबत्याबरोबर जाणार आहें मी नाटकाला ! आणि बसविणार कुठं ? अगदीं माझ्या शेजारीं पहिल्या रांगेंतील मधल्या खुर्चीवर !

माझें हें सारें बोलणें कुणाला उद्देशून आहे हें ती सारें समजलीच नाहीं. पण हसूनच वेळ मारून नेली तिनें. मी तिच्या अज्ञानामुळें अधिकच कष्टी झालों.

बिचारी ममता ! माझ्या प्रसन्नतेस लागलेल्या ओहोटीबद्दलचें कोडें तिला उलगडतां येत नव्हतें. आपलें अस्तित्व माझ्या दुःखास कारणीभूत होत आहे हें समजून ती कष्टी होई. पण आपल्या स्वभावांत मला आवडणाऱ्या गुणांचा समावेश तिला कांहीं करतां येत नव्हता. तिनें आपण होऊन मोठ्या हौसनें मजबरोबर नाटकाला यावें ही माझी इच्छा, पण न येण्याबद्दल ती हट्टच धरून बसली.

– आलंच पाहिजे तुला आज माझ्याबरोबर नाटकाला !

– उगीच कां बर आग्रह करतां मला ? त्या मोठ्या जमावांत जायचं नाहीं मला ' – अगदीं काकुळतीस येऊन ममता म्हणा्ो.

— वा, वा, जमायचं नाहीं म्हणजे काय? तुझ्याशिवाय नाटकांत माझं मन कधीं तरी रमेल असं का वाटतं तुला? ममता!—

आणि या प्रेमळ शब्दांनीं ममतेच्या उदास मुखकमलावर हास्यरेखा चमकली. माझं तिच्यावरील शब्दांनीं व्यक्त केलेलें प्रेम पाहून तिचा मजविषयींचा माझा आदर दुणावला. अगदीं विनयपूर्ण शब्दांत ती मंदस्मित करीत म्हणाली, — खरं सांगू का? नाहींच आवडत मला नाटकं सिनेमा पाहायाचें!

— कां?

— तें स्पष्टपणें सागतां येणार नाहीं मला! पण ज्या गोष्टी-पासून मला आनंदाची अल्पहि प्राप्ति होत नाहीं त्याच गोष्टी करण्याबद्दल आपण तरी कां म्हणून हट्ट घ्यावा? उगीच विचारते मी! लहान तोंडीं मोठा घास घेतल्याबद्दल रागवायचं नाहीं गडे.

— ममता, तूं माझ्याबरोबर यायला असे आढेवेढे कां घेतेस? माझा सहवास तुला दुःखदायी वाटतो का?

— छे. उगीच गैरसमजूत करून नका घेऊं. तुमचा सहवास वाईट वाटायला मी कोण परकी का आहे? इकडच्या सान्निध्यानें माझ्या संसाराचं सोनं झालं आहे. इकडून मला त्या वेळीं मागणी घातली नसती तर मी आज केवढ्या तरी दुःखद परिस्थितींत राहिलें असतें.

— मग सांग, तूं कां म्हणून माझ्याबरोबर येत नाहींस?

— चारचौघांत गेलं म्हणजे मी अगदीं भांबावतें. माझा जीव गुदमरून जातो आणि डोळे असूनहि भांड्यानें कांहीं कांहीं

पाहवत नाहीं.

— म्हणजे तुला लाज वाटते इतकंच ना?

— हो!

— लाजेचं मोठेंसं काय? ज्याप्रमाणें थंड पाण्याची पहिली कळशी अंगावर ओतण्यापूर्वी थंडीचें भय वाटतें त्याचप्रमाणें एकदा घरांतून बाहेर पाऊल टाकण्यापूर्वी तुला माझ्या सोबतीची लाज वाटेल. मग तूंच म्हणशील कीं, दोघंहि विनाखंड एकत्रच फिरूं!

माझें हें कळकळीचें बोलणें तिला मान्य झालें आणि आपलं अस्मानी पातळ पेहरून ती तयार झाली.

तिला त्या आकर्षक वेषभूषेंत पाहून मी आनंदित झालों. आम्हीं दोघेंहि मार्गानें चालूं लागलों. ममता चारपांच हातांचें अंतर मध्यें राखीतच होती व हळुहळू चालून समोरासमोर होण्याची तयारी मी करीत होतों.

+

याप्रमाणें एकत्र फिरण्याचे, सभासमारंभांत उपस्थित रहाण्याचे वगैरे अनेक प्रसंग वारंवार येऊन गेल्यानें ममतेची भीड चेपली. ठराविक गोष्टी नित्यनेमानें पार पाडण्याची संवय तिला जडली. सायंकाळीं सहल केल्याशिवाय करमेनासें झालें. आणि कधीं कधीं मी सोबत नसलों तरी ती एकटीच फिरायला जाऊं लागली!

त्या दिवशीं माझें डोकें अगदीं ठणकत होतं. अंगांत किंचित्

तापहि होता. ममता मला फिरावयास येण्याचा आग्रह करूं लागली. मी अगदीं निरुपायानें कबूल नसल्याचें सांगितलें. पण माझी वाटहि न पाहतां ती ओटीच्या पायऱ्या उतरली. तिचें तें वागणें मला कसे-सेंच वाटलें. मी म्हटलें,– ममता, माझं डोकं दुखतं. आज तूं एक-ट्यानें फिरायला जाऊं नकोस.

त्यावर ममतेनें म्हटलें,– तुमचं डोकं दुखतं यासाठींच करमणूक व्हावी म्हणून मी बाहेर सहल करावयाला जातें.

ती पूर्वी लाजाळू वृत्तीची होती. स्वतः दुःख भोगूनहि मला सुखविण्यांत तिला परमानंद होत होता. पण आज !



# अक्काचे अश्रू

सारा जन्म त्रासात काढावा लागणारीं कांहीं दुर्दैवपीडित माणसं नसतात का? तशीच आमची अक्का होती. तिच्या आयुष्याचा सारा इतिहास माझ्या स्मृतिक्षेत्रांत अगदीं लिहून ठेवल्यासारखा आहे.

नाहीं नाहीं म्हणतां अकालीं एकाद्या वेलीला सुंदर फूल यावं तसंच काकूंना बेचाळीसाव्या वर्षीं मातृपद आलं. पण अक्काचा जन्मकाल हाच त्या माउलीचा मृत्युकाल ठरला. अक्काच्या जन्मदिवशीं मी बाळंतिणीच्या खोलींत गेलें अन् रमाकाकूंचा चेहरा पाहिला. क्षीणतेमुळें तो किंचित् फिक्कट वाटत होता खरा पण हास्याचं चांदणं पसरलं होतं त्यावर! पण त्याच दिवशीं संध्याकाळीं काकूंनीं अक्काला एकटं टाकून इहलोकचा निरोप घेतला.

त्यावेळीं किती किती वाईट वाटलं मला! काकूंचा मला केवढा आधार होता. आणि आमचे काका! वृद्धापकाळांत पत्नी-सारखा प्रेमळ आसरा आतां त्यांना कसा मिळणार?

मी त्यांची पुतणी खरी. पण ते मला पोटच्या गोळ्यापेक्षां जास्त जपत. काकूंच्या अस्थि घेऊन नरसोबाच्या वाडीला जायच्या-वेळीं काकांनीं काढलेले करुणोद्‍गार अजूनही आठवतात मला! त्यांचा विसर मला जन्मजन्मांतरीं पडायचा नाहीं. ते गहिंवरलेल्या स्वरांत मला उद्देशून म्हणाले होते, – मंदा, तुझी काकी गेली अन् त्याबरोबरच माझी सारी उमेद, अवसान, धैर्य, सारं सारं गेलं आहे. मायेचा मोहक पाश तोडतां तुटत नाहीं. आयुष्य आहे तोंपर्यंत मरण स्वतःच्या हातांत नाहीं म्हणून जगायचं झालं! त्यांत गोडी अन् माधुर्यही नाहीं!– इतकं बोलतांनाच त्यांचा कंठ दाटून आला होता. तरी पण ते पुढें म्हणाले, – मंदा! आज मी तिच्या अस्थी घेऊन जातों; आणखी थोड्या दिवसांनीं माझ्या अस्थींच्या बाबतींत तुलाही असंच करावं लागेल!

– काका, असं भलतंच काय बोलतां? तुम्हीच असें बोलूं लागलांत तर कुणाच्या आधारावर मी जीवन कंठावं बरं? काकूचा अन् तुमचा कांहीं काल संसार तरी झाला आहे. पण मी तर समजूं लागल्यापासूनच संन्यासिनीचं जीनन कंठीत आहें, हें तुम्हींच पाहतां ना? माझं दुःख तुम्हांपेक्षां कितीतरी तीव्र नाहीं का?"

– तें काय मला समजत नाहीं? तूं आमच्या अक्काला मोठी कर. तिचा संसार पाहा आणि सुखी हो!

इतकं म्हणून ते टांग्यांत बसले.

मी मनाशींच विचार करूं लागलें. संसारांतील माधुरी चाखलेल्या म्हाताऱ्या काकांना पत्नीची उणीव पदोपदीं भासून दुःख होतं, आणि जिनं जन्मांत सुखाचा स्वाद घेतला नाहीं त्या मला काय आनंद होईल! अक्काकडे पाहून सुख मान! सांगायला केवढं सोपं आहे हें! पण दुसऱ्याचं सुख पाहून सुखी व्हायला केवढं विशाल-थोर अंतःकरण असावं लागतं याची अनुभवी म्हणणाऱ्या काकांना कल्पना तरी आहे का?

नवरा कोण याची ओझरती ओळख सुद्धां पटण्यापूर्वीं मी विधवा झालें. मनानं कल्पिलेल्या मनोहर सुखस्वप्नांवर दुर्दैवी भवितव्यानें काळोखी फासली.

लहानपणीं फुलांची केवढी हौस वाटायची मला. पण आज माझ्या स्पर्शानंहि फुलं भ्रष्ट होतात. फुलं जगताला पावन करतात पण दुर्दैवी विधवेला त्याचं काय? विधवेचं जिणं! छे. नाहींच कल्पना करवत त्याची!

माझे काका फार प्रेमळ होते. मला त्यांनीं कांहीं कमी केलं नाहीं. पण सौभाग्याचं गमावलेलं सुख मात्र लाभत नव्हतं मला!

हिंदु स्त्रियांच्या अंगांतील जातिवत त्याग माझ्यांत वसत होता म्हणूनच माझं पावित्र्य नष्ट करूं पाहणाऱ्या पापी डोंगरांचा चक्काचूर करून मी निष्कलंक राहूं शकलें. आणि हें माझं हृदयाचं समाधान केवढ्या मोलाचं! केवढ्या शोभेचं!

अक्का दिवसेंदिवस मोठी होऊं लागली. मराठी अभ्यासक्रम

यशस्वी रीतीनं संपवून तिनं इंग्रजी शाळेंत प्रवेश केला. तिचं अलौकिक सौंदर्य आणि तीव्र बुद्धिमत्ता यामुळें शाळेच्या फुलबागेंत या नव्या फुलाचं सन्मानानं स्वागत करण्यांत आलं. तिच्या अभ्यासांतील प्रगति अवलोकून माझं हृदय हर्षभरानं उचंबळून जाई.

ती कांहीं माझ्या उदरांत जन्मली नव्हती...मी तिची आई नव्हतें. पण रमाकाकूंच्या पश्चात् आईप्रमाणंच तिची जोपासना करण्याचं काम मीच स्वतः पार पाडल्यानं नकळत तिजविषयीं माझ्या निष्प्रेम हृदयसागरांत मातृहृदयाची भावना निर्माण झाली होती. आपण जोपासना केलेल्या झाडाच्या रोपट्याला सुंदर सुंदर फुलं–फळं आलेली पाहिलीं म्हणजे ज्याप्रमाणें कष्टाळू माळ्याला आनंद होत असतो तसंच अक्काचं आनंदी जीवन अवलोकून मलाहि होई.

अक्का आतां बरीच मोठी दिसूं लागली होती. तिच्या गोऱ्यापान वर्णाला साजेशाच तलम तलम साड्या ती आकर्षक पद्धतीनं पेहरी आणि त्या नाजूक वेषांत तिला पाहिलं म्हणजे आपण एखाद्या मूर्तिमंत देवांगनेलाच पाहतों कीं काय असा पाहणाऱ्याला भास होई.

अशा सर्वगुण–रूपसंपन्न तारुण्यवतीला आपली अर्धांगी करून सुखाचा संसार सजवावा असं कुणा आशावादी युवकाला वाटणार नाहीं ! कॉलेजांत तिचा शब्द झेलण्यास साऱ्या तरुणांचे तांडे तयार असत. पण एकाहि तरुणानं तिचं मन आकर्षिलं नव्हतं.

मात्र शेजारीं राहणाऱ्या विनयानं नकळत तिच्या मानस–मंदिरांत आपला प्रवेश केला होता. विनयाची आणि तिची ज्या दिवशीं

# अक्काचे अश्रू

ओळख झाली त्या दिवशीं मी पाहिलेला तिचा प्रफुल्लित चेहरा मी कधींहि विसरणार नाहीं. जलाभावीं कोमजलेल्या कळीला दंवबिंदूच्या सिंचनांत नवचैतन्य यावं तसंच विनयाच्या सान्निध्यानं तिचं मुख-कमल अगदीं चमकत होतें.

विनयाविषयीं अक्काला एकसारखा ध्यास लागला होता. एकाद्या दिवशीं तो न दिसला तर ती बेचैन होई. मला प्रेमाचे खरे–खोटे मार्ग माहित नव्हते पण अनिश्चित कल्पना असल्या-शिवाय कशा राहतील ?

शाळेंत अगदीं हुरहुरीनं जाणं, येतांना उशीर करणं, कुठं दार वाजलं तर अधाशी नजरेनं पाहणं आणि हातांत पुस्तक घेऊन भविष्यविषयक इतिहासाचं गोड चिंतन करणं हे जे तारुण्यसुलभ चाळे अक्कानं चालविले होते ते ती लपवीत असली तरी मला कळ-ल्याशिवाय राहिले नाहींत.

या बाबतींत तिला कांहीं तरी विचारावं व तिच्या मनींचा विचार समजून घ्यावा याची हुरहूर मला थोडी लागली नव्हती ! पण तशी संधी इतक्या दिवसांत आलीच नव्हती, ती आज आली.

आज अक्का साडेआठ वाजतां रात्रीं घरांत येत होती आणि बागेच्या फाटकापर्यंत विनय तिच्या सोबतीला आला होता. मी घरांत लोकरीच्या मफलरला पडलेलें ठिगळ भरीत होतें. मला आंतून बाहेरचं सारं दिसत होतं पण त्यांना माझं कांहीं दिसत नव्हतें. कारण दिवाणखान्याच्या बाहेरील ओटी आरशांनीं आच्छादिलेली दिसत होती.

त्यांच्या बोलण्याची कुजबूज ऐकूं येतांच मी मनाचे कान करून ऐकूं लागलें. अक्का म्हणत होती, – तुम्हीं भेटलांत म्हणजे मला सारं चांदणं दिसतं पण कधीं नाहीं भेटलांत तर---

– तर काय ?

– पूर्णिमाहि काळ्याकुट्ट अमावास्येसारखी अशुभ वाटते.

– आणि मला काय वाटतं तें नाहीं विचारलंस ?

– खरंच, माझ्याविषयीं काय वाटतं तुम्हांला ?

– कायसं वाटतं, पण खरोखर काय वाटतं तें मात्र सांगतां येत नाहीं.

– म्हणजे ! – हंसत हंसत अक्कानं विचारलं.

– अक्का, एकादं घर असावं अन् तिथं दिवा नसावा म्हणजे जसं ओकं ओकं वाटतं तसंच तुझ्याशिवाय माझं जीवन मला वाटतं.

– अस्सं !

– खरंच ! अक्का, प्रत्येक व्यक्तीला आपलं असं एखादं तरी जिवाभावाचं माणूस असल्याशिवाय कसलं सुख... कसला आनंद आला आहे ? मी कॉलेजांतून दमून भागून येतांना माझ्या आगमनाची आतुरतेनं मार्गप्रतीक्षा करणारे दोन सुंदर डोळे पाहून मी माझा शीण विसरतों आणि दुप्पट उत्साहानं अभ्यास करतों !

– तुम्हीं माझे डोळेच पाहतां. मग माझें मन पाहिलं तर काय म्हणाल ? डोळ्यांना लपवाछपवीचा खेळ खेळतां येतो पण मनाला नाहीं. माझ्या मनाचं छायाचित्र जर तुम्हीं घेतलंत तर

त्यांत तुम्हांला स्वतःचंच प्रतिबिंब दिसेल, इतकं तें 'विनय' मय झालं आहे.

अक्कानं त्याचा निरोप घेतला. निरोप घेतां घेतां तिनं एक टपोरें गुलाबपुष्प त्याच्या कोटाला लावलं आणि त्यानं--

त्यानंहि एक फूल तिच्या सुबक वेणीच्या मध्यभागीं खोवलं.

मी तारुण्यांत होतें त्यावेळीं अगदीं अस्सं संसाराचं मोहक कल्पनाचित्र रेखाटलं नव्हतं का ? अक्काचा त्यांत काय दोष ?

मी खुषीनं अक्काला विचारलं त्यावेळीं तिनं न लाजतां विनयाविषयींची आपली भावना व निश्चय मला कळविला. दोघंहि परस्परांना अनुरूप असल्यानं मी त्यांच्या विचाराला शाब्दिक सहानुभूति दिली आणि त्यामुळें तिला भरपूर आनंद झाला.

ती मला उत्सुकतेनं म्हणाली, – मंदाताई, विनयाला जाऊन सांगू का आतांच्या आतां ?

– काय ?

– कीं तुझी मान्यता आहे म्हणून ?

– कशाला ?

– बरीच आहेस कीं ग तूं! आणि अक्का अशी कांहीं लाजली कीं कितीहि पाहिलं तरी तें दृश्य लोभनीय अन् अवीट वाटावं !

*

आणि त्या दिवशीं बॅलार्ड पीयरवर विनयला विलायतेस जातांना निरोप देतांना अनुभवलेलं दृश्य किती मोहक !

एलिसिया बोटीच्या कॅबिनमध्यें विनय बसले होते. त्यांची, अफाट मित्रमंडळीला निरोप देतां देतां तारांबळ उडाली होती. आगबोटीनं पहिली शिट्टी वाजविली व चीफ ऑफिसरनें भेटावयास आलेल्या मंडळींना खालीं उतरण्यास सांगितलं. लोक लगबगीनं उतरले, पण अक्का ?

ती विनयला सांगत होती, – विलायतचा किनारा लागतांच मोहाचे क्षण उत्पन्न करणाऱ्या किती तरी वस्तू तुम्हांला दिसतील, त्यावेळीं आपल्या अर्धांगीपदासाठीं विरहानं व्याकूळ झालेली अक्का हिंदुस्थानांत आहे याचा विसर पडूं देऊं नका.

– अक्का, संशय मत्सर हीं खऱ्या प्रेमाचीं लक्षणं बरं का ? पण अक्का, एक गोष्ट तूं विसरतेस !

– कोणती ती ?

– मी अभ्यासासाठीं जाणारा विद्यार्थी आहे. चैनीसाठीं जाणारा उधळ्या संस्थानिक नाहीं !

-- खरं ना हें ?

– अगदीं खरं ! माझ्या शब्दावर तूं विश्वास ठेव ! बोटीनं दुसरी शिट्टी वाजविली. चीफ ऑफिसरनें फालतू लोकांना धक्क्या-वर ढकलण्यास सुरवात.

हळू हळू बोट जात होती. बोटीच्या हेलकाव्याप्रमाणं अक्काचं अंतःकरण हेलकावे घेत होतें.

ती घरीं आली. तिला चैन पडेनासं झालं. आमचं घर मूर्ति नसलेलं प्रार्थनामंदिर असंच ती समजत होती.

# अक्काचे अश्रू

विनयाचीं पूर्वी लांबलचक पत्रें दर आठवड्याला येत होतीं. पण पांच सहा महिन्यांनतर तीं पंधरवड्याला यायचीं आणि तीं अगदीं त्रोटक! परत प्रेमाचा... ओलाव्याचा जिव्हाळा फारच अल्प असायचा! माझं मन उगीच संशयित झालें पण अक्काचा आत्मविश्वास दांडगा होता. अप्सरांच्या नगरींत जरी विनयाला नेऊन सोडलं तरी तो आपल्याशीं प्रतारणा करणार नाहीं याची तिला केवढी जबरदस्त खात्री! पुरुषांची फुलपांखरी वृत्ति त्या अननुभवी बालला परिचित नव्हती.

पण जेव्हां सहा सहा महिने विनयाचें पत्र येईनासं झालं त्यावेळीं ती तर वेडीपिशी झाली. मी तिला धीर द्यावा. विनयाच्या चारित्र्याचा भरंवसा द्यावा. पण मला मात्र स्वतःलाही मी जें तिला सांगतें ते पटत नव्हतें.

अखेर पांच वर्ष लोटलीं. त्याच्या उत्कर्षाच्या विविधवार्ता फोटोसह वृत्तपत्रांत वाचून अक्काबरोबर मलाहि हर्ष होई. पण ह्या वैभवाची वाटेकरीण माझी अक्का होईल कीं काय ह्याची हुरहुर माझं कोमल अंतःकरण खचून टाकी.

अशींच एक दोन वर्षे आणखी लोटलीं. अक्काला वेडी आशा वाटत होती आणि मला वेडीला संशयच वाटत होता.

आणि त्याच एलिसिया बोटीवर विनय येणार म्हणून गांवांत त्याच्या स्वागताची केवढी तयारी चालली होती! पण आम्हांला त्याच्या स्वागताची गंधवार्ताहि नव्हती.

मी म्हटलं,– अक्का उद्यां आपण धक्क्यावर जाऊं नये?

— असं कसं होईल मंदाताई ? ते येणार हें ऐकलं त्यावेळे-पासून मी वेडीपिसी झालें आहे. ज्यांच्यासाठीं मी आजपर्यंत जगलें, त्यांना पहिल्यांदा भेटण्याचा हक्क आणखी कुणाला आहे ? तो मलाच, नाहीं का ?

तिच्या भोळ्या भाबड्या भावनेला धक्का देणं मला आवडलं नाहीं म्हणून मी उगीच राहिलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्ही बॅलार्ड पीयरवर गेलों. अक्कानं मोगऱ्याच्या सुवासिक कळ्यांची माळ गुंफून बरोबर घेतली होती.

एलिसिया किनाऱ्याला लागतांच अनेक संस्था, वृत्तपत्र-रिपोर्टर यांनीं विनयरावाचा सत्कार केला. त्याला मानपत्रें व हारतुरे दिले. त्यानेंहि सर्वांना उत्तर दिलें व त्यांत हिंदुस्थानच्या हितासाठीं आपण आपलं जीवन खर्चिणार असं आश्वासन दिलं.

त्यानंतर आप्तस्वकियांच्या गांठी भेटी होऊं लागल्या. सर्वांशीं हंसत खेळत संभाषण चाललें होतें. अक्काच्या अंतःकरणाची ओढ विनयाच्या भेटीसाठीं एकसारखी लागली होती. पण मुंबईचे अधि-कारी, संपन्न व्यापारी यांनीं त्याच्या भंवती एवढं भक्कम कडं केलं होतं कीं बिचाऱ्या अक्काचा प्रवेश तिथं झालाच नाहीं.

अखेर गर्दी कमी झाली. आणि मी व अक्का पुढें सरकलों. आपल्या मूळच्या तेजस्वी पण आतां फिक्कट झालेल्या डोळ्यांनी तीक्ष्ण दृष्टि त्याजकडे वेधीत अक्का म्हणाली,— विनय !

-- कोण तूं... तुम्हीं ! -- एखाद्या अपरिचितानेंच आगंतुकपणें

आपणाला हांक मारली असा हावभाव करीत विनय म्हणाला.

-- मी कोण ?

-- हो! खरंच ओळख नाहीं पटली! -- आणि त्याचे हे शब्द ऐकल्यानंतर अक्काला बोलण्याचं सामर्थ्यच राहिलं नाहीं. तिनं माझ्या हातांचा आधार घेतला व ती खालीं आली.

आम्हीं घरीं आलों. त्यानंतर तिनं विनयाचं नांवहि घेतलं नाहीं, पण ती त्याच्या प्रतिमेची पूजा मात्र दररोज करीत होती. तिनं स्वागताचं चिन्ह म्हणून केलेली माळ सुकली होती पण तिच्या अंतःकरणांतील भावना मात्र ताज्यातवान्या होत्या!

विनयासाठीं एकनिष्ठेनं संन्यासिनीसारखं आयुष्य कठण्यांत ब्रह्मांडाचा आनंद आहे असें अक्का ज्या ज्या वेळीं तिच्या लग्ना-बद्दलचा प्रश्न निघे त्या त्या वेळीं मला सांगे. ते अश्रू आनंदाचे कीं दुःखाचे हें न कळूं देण्याइतकं बेफिकीर जीवन तिनं आखलं होतं.



# फसवेगिरी !

– तापाच्या भरांतील तुझं हें बोलणं खरं, पण त्यामुळं माझा जीव कसा करपतो हं तूं विसरतेस !

– हें बोलणं तापांतील मुळींच नाहीं. माझ्या भग्न हृदयांत न मावणाऱ्या अग्नीचे हे स्फुल्लिंग आहेत. मानवी सौख्याचं ह्यापेक्षां असं कोणतं अहित तुम्हांला करतां येण्यासारखं होतं ?

– पुष्पा ?

– नका ! त्या गोड अन् मधुर नांवानं मला हांका मारूं नका ! त्यामुळें ह्या अभागिनीच्या अंतःकरणांतील खोल जखमांवर मिठाचं पाणी घातल्यासारखं होईल.

– पुष्पा ! थांब ना जरा ? असं भलतंच काय बोलतेस हें ?

– बोलूं नको तर काय करूं ? आजपर्यंत उगी राहिलं पण यापुढें हें रहस्य लपवून लटकेपणा करणं साधत नाहीं मला !

हवी तसा तिलाहि आपला पती गाहणं जरूर आहे इतकंहि तुम्हांला कळत नव्हतं का? आपलं स्वतःचं कुरूपत्व उघडकीस येऊं नये म्हणून रहस्याच्या गोंडस नांवाखालीं तुम्हीं आपला कावा साधला हें न कळण्याइतकी मी खुळी आहे का?

पुष्पानं जीव तोडून केलेल्या हृदयविष्करणासंबंधीं मी विचार करूं लागलों त्यावेळीं माझी चूक माझ्या ध्यानीं आली. माझी नवमतवादी बाजू एकेरी स्वरूपाची होती. आजचा नवमतवाद म्हणजे आपणाला हवं तें करण्याला एक सोपा मार्ग अशीच बहुतेकांची समजूत नाहीं का? दुसऱ्याच्या बायकांशीं विधिनिषेध न बाळगतां वागूं पाहणारे कांहीं 'नवमतवादी' स्वपत्नीच्या शीलाबद्दल केवढी खबरदारी घेतात हें नाहीं का आपण पहात? आणि त्यांच्या वागण्यांतील दुटप्पीपणा तरी किती?

आपल्या दिवाणखान्यात श्रीकृष्णाचं चित्र लावतील व श्रीकृष्ण भगवान सोळा हजार स्त्रियांचा नाथ होता म्हणून नवमतवादाच्या पुरस्कारार्थ आपण ती तसबीर लावली आहे असेंच सांगतील; आणि सनातन्यासमक्ष त्याच तसबिरीला नमस्कारहि करतील. जें आपणाला हवं तें नवमतवादाच्या नांवाखालीं करण्याची त्यांची तयारी नेहमीं असते!

पुष्पाची प्रकृति आतां खालावत चालली होती. तिचं कोमजलेलं मुखकमळ पाहिलें म्हणजे माझे डोळे भरून येत आणि तिच्या नाशाला कारण मीच ह्याचं चटकन् मला स्मरण होई व गुन्हेगाराच्या नजरेनं मी तिच्याकडे पाही. तिच्याहि डोळ्यांत अश्रूंची गर्दी जमे. तिनें केलेल्या निवेदनामुळें माझ्या झणझणीत डोळ्यांत अंजन पडलें.

त्या दिवसापासून हास्याची व माझी ताटातूट झाली होती.

तिला सुखी करण्याचा मार्ग कोणता? तिच्या भग्न मनावर आशेच्या दंवबिंदूंचं सिंचन करून तिचा चेहरा प्रफुल्लित करण्यास मी असमर्थ होतों. नवमतवादी असूनहि माझ्याशीं पटत नाहीं तर तूं मनाजोगता जोडीदार शोधून त्याच्याबरोबर सुखाचा संसार थाट असें मी पुष्पाला सांगूं शकत नव्हतों. तेवढं औदार्य माझ्यांत नव्हतें.

आणि पुष्पा जिवंत असूनहि मला मेल्यासारखीच होती. स्वतःच्या मनाशींच फसवेगिरी करून मी वरवर हंसत व आंतून रडत होतों.



# हट्टी कोण?

स्त्रिया फार हट्टी असतात असाच बहुतेक पुरुषांचा समज असतो. पण, माझ्या मतें पुरुष कांहीं कमी हट्टी नसतात. कांहीं कांहीं बाबतींत स्त्रिया हट्टी असतीलहि पण त्या निर्लज्ज मात्र नसतात. तथापि पुरुष परमावधीचे हट्टी असूनहि वर निर्ढावलेले निर्लज्ज असतात. माझ्या या विधानाची सत्यता पटविण्यासाठीं म्हणून फार जुन्या काळची एक गोष्ट मी आज वाचकांना सांगणार आहे.

*

पेद्रू हा त्या गांवांतील एक कष्टाळू शेतकरी. क्लारा नांवाच्या एका खुपसुरत पोरीशीं त्यानें लग्न लावलें होतें. पतीच्या व्यवसायांत त्याला एकनिष्ठेनें साह्य करणें हें एकच ध्येय क्लाराचें असल्यानें त्या

नवविवाहित जोडप्याचा संसार परमोच्च सुखाचा झाल्यास त्यांत नवल तें कसलें ? त्यांचें घरकुल अगदीं...अगदीं लहान ! तेवढ्याच अपुऱ्या अशा चिमुकल्या जागेवर क्लारा स्वयंपाक करी, तिथंच देवाची प्रार्थना करी, शिवणकाम करी, नाचे-- गाई सारं कांहीं तिथंच करी ! जागेच्या अपुरेपणामुळें त्यांच्या मधूर सुखांत कध्धीं कध्धीं म्हणून कमतरता आली नाहीं. पहांटेच्या पाहिल्या प्रहरीं पेद्रूनें शेतांत जावें तें साऱ्या वाटेंत क्लाराविषयीं मंदमधूर आठवणी काढीत व तिचे गुण गातच ! आणि त्याच्यासाठीं मऊ-मऊ अन् गरमागरम भाकऱ्या भाजतांना क्लाराच्या मनःसागरांत तरी दुसऱ्या कोणत्या लहरी उचंबळत होत्या ? अशा त्या जोडप्याच्या संसारात आजपर्यंत तंटा- बखेडा असा कधीं माजला नव्हता. त्यांना कधीं राग रुसवाहि आला नव्हता; मग अबोला कुठला ? त्यांच्या रम्य संसाराची गाडी अगदीं सिधेपणानें चालत होती.

त्या दिवशीं संध्याकाळच्या सुमारास पेद्रू जरा उतावळेपणानेंच घरीं परतला. त्यानं म्हटलें,- क्लारा, थोडं थोडं वाढ व मेज मांड पाहूं ! लवकर लवकर जवूंया आणि झटपट झोपूंया ! तिनें नवऱ्याकडे पाहिलें. त्यानें उलट तिच्याकडे पाहिलें. ती कांहीं बोलली नाहीं. व तोहि पण कांहीं बोलला नाहीं. असल्या गोष्टी बोलायच्या नसतात. कारण त्यांचे डोळेच बोलत होते...हांसत होते.

तीं नेहमींप्रमाणं झोंपलीं पण त्या घरकुलाचा एक दरवाजा उघडाच ठेवलेला पाहून पेद्रू आपल्या बायकोला म्हणाला, – दर-वाजा नाहीं का झांकत ?

# फसवेगिरी

– पुष्पा ! लाडके !

– जिच्या मनोहारी काल्पनिक सुखप्रासादाचं स्मशान बनवि-ण्यास तुम्ही मागं-पुढं पाहिलं नाहीं तिला पुष्पा ! पुष्पा !! म्हण-णाऱ्या तुम्हासारख्या पाषाणहृदयी —

– पुष्पा !–किंचित जीभ चावीत मी म्हटलं,–तुझं हें बोलणं ऐकलं म्हणज मी अगदीं वैतागतों. सात आठ वर्षं एकमेकांच्या सान्निध्यांत ब्रह्मांडांतील आनंदरस आम्हीं लुटला आणि आज तूं हें असलं बोलतेस ? ह्या तुझ्या वागण्याला कांहीं ताळमेळ तरी आहे का ?

– माझं आजपर्यंतचं वागणं लटकं...फसवं होतं !

– खरंच ?

– हो ! हृदयांत रडत व वरवर हंसत एकादा नोकर आपल्या दुष्ट धन्याची चाकरी नसतो का बजावीत ? तशांतलाच तो प्रकार होता. माझ्या त्या वागण्यांत दिलाचा सच्चेपणा नव्हता...प्रेमाचा नुसता गंधहि नव्हता; पण तें जुलुमाचं – निरुपायाचं वागणं होतं !

– माझ्याविषयीं एवढा तिटकारा वाटण्यास मी वाईट आहे ?

– छेः छेः अगदीं मदनाचे पुतळेच जणुं !

– पण सौंदर्य हें आपल्या हातचं थोडंच आहे ! तें देवाघरचं देणं आहे ! विचारी माणसानं बाह्य सौंदर्यापेक्षां अंतःसौंदर्याकडे ...स्वभावाकडे विशेष पहायचं असतं !

– तुमचा स्वभाव तरी चांगला आहे असं तुम्हीं सांगूं शकाल का ?

– तर काय मी अगदींच वाईट...दुष्ट स्वभावाचा आहें ?

– तें आपल्याच अंतःकरणाला विचारा ! विवेक करण्याची शक्ति तुमच्यांत थोडी जरी शिल्लक राहिली असेल तर तुमचं दुष्ट अन् पापी मन तुम्हीं माझी फसवगिरी केली – गळा कापला असंच तुम्हांला सांगेल !–असं म्हणून पुष्पा दुसऱ्या बाजूला वळली. माझ्याकडे पाठ फिरवून तिनं आपला तिरस्कार विशेष स्वरूपात व्यक्त केला.

– पुष्पा, थोडं सरबत आणूं का ?

– आणा !–तहानेनं अगदींच व्याकूळ झाल्यानं निरुपायामुळं तिनं तसं सांगितलं असावं; नपेक्षां तिच्या सेवेचं सुखहि ती मला लाभूं देणार नव्हती. पत्या फळाची आज्ञा पत्करून मी सरबत करण्यासाठीं अंतर्गृहांत गेलो. लिंबांतून निघणाऱ्या रसाप्रमाणंच माझ्याहि जीवनांतील रस आपोआप आटत होता. जिला मी जन्माची स्नेहसखी म्हणून आयुष्यांतील ऐन तारुण्यकाल कंठीत होतों ती माझी धर्मपत्नी माझा मनःपूर्वक द्वेष करीत होती, ह्या दुःखद विचारांचा स्पर्श होतांच माझं हृदय अगदीं दुःखव्याप्त होऊं लागलं. यापुढें पुष्पाच्या तोंडून निघणारे बोल किती कठोर अन् दुःखद असतील याची नुसता कल्पनाहि मला भयदायक वाटूं लागली होती.

मी तिच्या हातांत सरबताचा पेला दिला. एखाद्या अधाशाप्रमाणं घटाघट पिऊन तिनं तो चटकन् रिकामा केला. तेवढ्यांत माझ्या कष्टी मनाला समाधान वाटलें. तिनं आपल्या सुकूं पाहणाऱ्या ओठांना जिभेच्या आधारानं ओलावा दिला व ती म्हणाली,– अगदीं मृत्यूशय्येवरून ही रहस्यपूर्ण अप्रिय हकिकत मी तुम्हांला आज

निवेदणारहि नव्हतें. पण पुरुष हे कधीं म्हातारे होत नसतात. मी मरण पावल्यानंतर तुम्हीं दुसऱ्या एकाद्या निरपराधी बालिकेचा गळा असाच निर्दयपणानं कापाल म्हणूनच मला हें अखेरचं हृदयाविष्क-रण करावं लागत आहे !

— पुष्पा, असा धीर नको सोडूं ! तुझा ताप उतरेल व तूं पूर्ववत् बरी होशील ! भिऊं नकोस !

— छेः छेः मरणाला मी मुळींच भीत नाहीं. कदाचित् मी जगेन म्हणूनच मला धास्ती वाटते. जगण्याचाच मला मोठा कंटाळा आहे. आजच्यासारखं नीरस अन् कंटाळवाणें जीवन कंठण्यापेक्षां मृत्यूचे कठोर पाशसुद्धां मला प्रिय अन् स्वागतार्ह वाटतात !

— पुष्पा, तुला असं काय कमी आहे म्हणून तूं अशी वैता-गतेस ? भरलं घर तुझं आहे ! साऱ्या वैभवाची धनीण तूं आहेस ! सोन्यासारखीं दोन मुलं व——

— काय ? त्या कुरूप कारट्यांना तुम्हीं सोन्यासारखीं मुलं असं म्हणतां का ? माझ्या पोटचे ते गोळे असूनहि त्यांच्याकडे माझ्यानं ममतेनं पाहवत नाहीं ! फुलांसारखीं सुंदर सुंदर मुलं व्हावयाचीं मला ! पण तुमच्या संबंधामुळं हे काळेकुट्ट कोळसे निर्माण झाले आहेत. जणुं काय तुमच्या अक्राळविक्राळ स्वरूपाचीं तीं प्रतिबिंबेंच ! आज मी तुमच्यासाठीं रडत आहें ! उद्यां या कुरूप कारट्याचा ज्यांच्याशीं संबंध जडेल त्या सुद्धां अशाच रडतील ! एका तुमच्यामुळें ही अनर्थ-परंपरा केवढा कालपर्यंत चालेल हें कांहीं सांगतां येण्यासारखं नाहीं !

— तिनं एक खोल सुस्कारा सोडला.

— पण पुष्पा, माझ्या कुरुपतेला मी जबाबदार नाहीं हें मी

नुकतच नाहीं का सांगितलं? तो निसर्गाचा खेळ आहे !

— असेलहि ! पण तुम्हीं मला अज्ञानांत ठेवून बुद्धिपुरःसर माझा गळा कापला आहे. माझ्या महत्वाकांक्षांचा... भावनांचा सत्यानाश केलात तुम्हीं !

— तो कसा ?

— ज्यावेळीं तुम्हीं वधुपरीक्षेसाठीं आलांत त्यावेळीं काय सांगितलें त्याचं आहे का स्मरण ?

-- तो एक विनोदी प्रकार होता. नवरा तो प्रत्यक्ष मीच असं सांगितलं असतं तर त्यावेळीं तूं लाजली असतीस, तुला डोळे भरून पाहण्याची संधी मला लाभली नसती म्हणून नवऱ्याचा मित्र असं सांगून मी अगदीं रहस्यपूर्ण वधुपरीक्षण केलं !

-- छेः छेः केलेल्या पातकांत खोटेपणाची आणखी भर घालूं नका !

-- मी बोललों तें खोटें का ?

- तर ! तुम्हीं नवरे म्हणून सांगितलें असतें तर मी तुमचा धिक्कार करून लग्नाला संमती दिली नसती या भयानें तुम्हीं त्यावेळीं फसवेगिरी करून आपला स्वार्थ साधून घतला !

-- भलतंच काहीं तरी बोलतेस झालं !

-- भलतंच म्हणूं नका ! माझं मत अगदीं खरं आहे ! एवढे नवमतवादी...स्त्री स्वातंत्र्याचे पुढारी तुम्हीं !

-- मग यात काय झालं ?

— आणि आपणाला जशी जन्माची जोडीदारीण पाहायला

# हट्टी कोण

– तो मी उघडा ठेवला नाहीं, तूंच ठेवलास!–असें म्हणून क्लारानें दारच्या फटींतून बाहेर पाहिलं. सारं आकाश ताऱ्यांनीं फुललेलं दिसत होतं.

– तूं पूर्वी बाहेर गेली होतीस म्हणून तो तूंच बंद केला पाहिजेस! तूं केलेल्या चुकीबद्दल विनाकारण मला त्रास व दग-दग कां?

– पण शेवटीं घरांत तूंच आला नाहींस का?

– हो!

– म्हणून तें तूंच बंद केलं पाहिजेस!

– हट्टी आहेस तूं फार!

– मी?

– हो तूंच!

– पण, तूं दार बंद करायला गेलीस तर तुझं कांहीं खर्च होत आहे का?

– नाहीं जायची मी! हा खर्चाचा किंवा श्रमाचा प्रश्न नाहीं!

– तर कसला?

– हक्काचा! तत्वाचा!

– असं आहे तर दरवाजा उघडाच राहूं दे! मलाहि तो बंद करायची जरूरी नाहीं!– पेद्रू तिरस्कारानें म्हणाला.

तीन गोष्टींत यश संपादणें हें फार कठीण काम आहे असं कुठंतरी एका अरबी कवीनें म्हटलं आहे. एक मजबूत किल्ला, घोडा आणि हट्टी बायको! या गोष्टीचें स्मरण यावेळीं पेद्रूला झाल्याशिवाय

राहिले नाहीं. या रागाच्या तिरमिरींत पेद्रूनें आपल्या प्रियसखीकडे पाठ फिरविली. जणूं काय तिची आपण पर्वाच करीत नाहीं असें दर्शविण्याचा त्यानें प्रयत्न केला.

अर्धवट दारांतून आकाशांतील तारे घडी घडी विशेष तेजस्वी दिसत होते व पक्ष्यांची मंजुळ किलबिल ऐकूं येत होती.

– दाराला कडी लाव, चल ना ?–किंचित नमतें घेत क्लारा म्हणाली.

– तूंच चल ! अखेर तुला कळेल कीं तुझ्याहिपेक्षां मी हट्टी आहें !

– आमच्यापैकीं जास्त हट्टी कोण आहे हें यापुढें कळायचं आहे. पण ऐक ! मी बायको आहे हें विसरूं नकोस !

– आणि मी पुरुष आहे. पाहूं या ! जर कडी लावली गेली तर ती तुझ्याकडूनच लागली जाईल ही तूं खात्री बाळग !

– फक्त बळजबरीनं तूं मला तसं करायला भाग पाडलंस तर माझा निरुपाय आहे. तर एक तें तूं आतां उठून झांकलं पाहिजे न पेक्षां उघडंच राहील !

– एकादा लांडगा आला तरी मी अंथरुणावरून उठणार नाहीं !

– आणि घर जळलं तरी मी नाहीं उठायची !

– पाहूं या !–असें म्हणत पेद्रू थोडा वेळ विचार करूं लागला. थोड्या वेळानें तो म्हणाला, -- क्लारा !

– काय !

## हट्टी कोण

– आम्हीं या बाबतींत थोडासा सोपा व सुलभ करार ठरवूं या !

– बरं ठरवूं या

– आमच्यापैकीं जो कोणी आतां पूर्वी बोलेल त्यानें दरवाजा बंद करावा असें ठरवूं या ! आहे कबूल ?

आपला पराजय होईल या भयानें क्लारा बोलली नाहीं. तिनं नुसतं मानेनं अट कबूल असल्याचं नवऱ्याला सांगितलें.

बराचसा वेळ गेला. तास, अर्धा तास किंवा थोडा जास्तहि असेल. तीं दोघेंहि नेहमींप्रमाणं झोंपलीं. एकमेकांशीं बोललीं मात्र नाहींत. झोंपण्यापूर्वी मोठा गळा काढून खिस्ताची प्रार्थना करण्याची त्यांची नित्यपद्धत होती. आज तीं बोललीं नाहींत खरीं पण भक्तिपूर्ण अंतःकरणानें त्यांनीं प्रार्थना मात्र पुरी केली. जिथं देवावर विश्वास आहे तिथं शब्दांची किंमत ती काय ?

मध्यरात्रीच्या सुमारास त्या अर्धवट दारावर कुणी तरी थाप मारल्याचा त्यांना भास झाला. किंचित् वेळानें थाप जरा जोरानें ऐकूं आल्यानें तो नुसता भास नव्हता हेंहि त्यांच्या ध्यानीं आलें. थोड्याच वेळानें "कोण घरांत ?" प्रवासी ओरडला. "किल्याकडे जाण्याचा रस्ता कोणता ?"

तीं आपल्या अंथरुणावर जशीं होतीं तशींच राहिलीं – हललीं नाहींत आणि बोललींहि पण नाहींत. त्या प्रवाशाला कांहीं सरकारी निरोप पोंचविण्यासाठीं किल्ल्याकडे जायचं होतं. चार रस्त्यावर पोंचतांच तो जरा बुचकळ्यांत पडला. त्यानें इकडे तिकडे पाहिलें

व दरवाजा अर्धवट उघडा दिसला म्हणूनच तो पेद्रूच्या घराकडे वळला. तीं दोघें झोंपलेलीं आहेत हें कळतांच त्यांना उठविण्याचे सारे सभ्य त्यानें प्रयत्न केले पण त्यांना जबाब मिळना. आपल्या हातांतील काठी त्यानें दारावर आपटली. बुटांचे लोखंडी नाल जमिनीवर आदळले तरीहि त्याच्या प्रश्नानें त्याला उत्तर मिळत नव्हतें. केवढें आश्चर्य ? तो मनाशींच विचार करीत होता.

त्या दोघांनी किंचित हालचाल केली. पेद्रूनें व क्लारानें त्या प्रवाशाकडे पाहिलें व मग तीं एकमेकांकडे पाहूं लागलीं पण स्तब्धच राहिलीं. त्या जोडप्याचं तें विचित्र वागणं त्या प्रवाशाला दर खेपेला विशेष आश्चर्यकारक वाटत होतें. तो जरा जवळ गेला व जणूं काय तीं बहिरीं असावींत या दृढ समजुतीनं ओरडला,—किल्ल्याकडे जायची वाट कोणती ?

क्लारानं पेद्रूकडे पाहिलं. पेद्रूनं तिच्याकडे पाहिलं. त्या दोघां-नींहि पुन्हा प्रवाशाकडे नजरफेंक केली. जणूं काय कांहींच घडलें नाहीं किंवा घडत आहे त्यांत आपला यत्किंचितहि संबंध नाहीं अशाच भावनेनें तें जोडपं वागत होतं.

त्या मूक पुतळ्यांकडे पहात तो प्रवासी विचार करीत होता. हीं बहिरीं असावींत कां ? कीं मुकीं असावींत ! कीं वेडींच आहेत ! आहे तरी काय हें ? कीं हीं मुद्दाम स्तब्धता स्वीकारून आपली थट्टा करीत आहेत ? त्याच्या मनांत अशा परस्परविरोधी विविध विचार लहरी स्पर्शून जाऊं लागल्या. आपल्या हातांतील तलवार त्यांच्यावर चालवून हीं मरणाच्या भयानें तरी ओंठ हालवितात कीं काय हें पाहण्याचाहि त्याला त्यावेळीं मोह झाल्याविना राहिला नाहीं. पण

क्लाराचं मोहक मुखकमल पाहतांच ती लष्करी युक्ति त्यानें लगेच डोक्यांतून काढून टाकली. आणि त्यांना जागें करण्यासाठीं त्यानें निरनिराळ प्रय न केल. पण तीं झोंपलींच नव्हतीं तिथं याचा त्यांना उठविण्याचा प्रयत्न कसा सफल होईल ?

त्या प्रवाशान भेसूर पद्धतीचं गायन केलं, शिव्या हांसडल्या, बीभत्स शब्दांची आपल्या गायनांतून खैरात केली. पण केवढं आश्चर्य ? तीं हालत होतीं, क्वचित हासतहि होतीं पण बोलत मात्र नव्हतीं. त्या प्रवाशाच्या आश्चर्यांत अधिकच भर पडली. तो किंचित रागांतच म्हणाला, "अस्स ? अजून बोलायला नको का ? छान ! आतां एवढ्या रात्रीं मी दुसरीकडे जायचं कुठं ? आजची रात्र सोय गैरसोय जें काय होईल तें होवो. घडेल तें घडो मी इथंच पडतों झालं !" त्या नवरा-बायकोनें पुन्हा त्याच्याकडे पाहिलं व आपल्या मौन्यव्रताचा भंग न करतां त्याची हालचाल सुरू झाली.

त्या प्रवाशानें आपले जाडेले बूट काढले. आपला अधिकारी लष्करी पद्धतीचा वेष उतरविला व अगदीं झोंपायच्या साध्या पोषाखांत तो झोंपण्यासाठीं जागा पाहूं लागला. पण ती जागाच एवढी लहान होती कीं तिथें त्यांनीं पसरविलेल्या बिछान्याशिवाय एक इंचहि जागा नव्हती. प्रवाशानें अधिक वेळ काढला नाहीं. त्या दोघांचे मध्यें जाऊन तो झोंपूं पाहूं लागला.

तरीहि पेद्रू स्तब्धच होता. पण क्लारा उठली व रागानें तिनं त्या प्रवाशाकडे पाहिलं. – निर्लज्ज ! किल्ल्याकडे जायचं आहे ना आपल्याला ?

– होय. – प्रवासी थरथर कांपत होता

– मग आम्हीं दोघं हीं तुम्हांला किल्ल्याच्या भिंती वाटलों कीं काय?–ती जास्त बोलली नाहीं. तिनं प्रवाशाला किल्ल्याचा मार्ग दाखविला.

तो प्रवासी पोषाख वगैरे करून बराच दूर गेल्यावर क्लारा म्हणाली, – पेद्रू! तूं हट्टी अन् निर्लज्ज आहेस! त्या परकी माणसानं अगदीं माझ्या शेजारीं झोंपलेलं तुला आवडणार होतं, नाहीं का!

– क्लारा! तूं बोललीस! पैजेंत हरलीस! दार बंद कर पाहूं?

कधीं कधीं नवरा-बायकोंत मतभेद झाला व त्यासंबंधीं मला कांहीं समजलं तर मला ह्या गोष्टीचं स्मरण होतें.



# त्यागाचें समाधान

'शैलजा - भवन'कडे मोटार थांबतांच मी लगबगीनें खालीं उतरलों आणि त्या टुमदार बंगलीच्या दरवाजावरील घंटा दाबली. एकदोन मिनिटांतच दार उघडलें गेलें व साधारण स्वरूपाची एक तरुणी किंचित् लाजत पण स्वागतपूर्वक म्हणाली, – कोण पाहिजे होतं तुम्हांला?

– रतीलाल शेठचं घर हेंच नव्हे का?

– हो! - मंदस्मित करीत ती तरुणी उत्तरली.

– आहेत का शेठ घरांत?

– छे; ह्या वेळीं ते बहुधा दाणाबंदरवर असतील.

– मग केव्हां परतणार घरीं?

– कितीही वेळ केला तरी बाराच्या आंत यायचेच ते!

— अच्छा! मी बसतों तर इथं! पण बेन, त्यांच्या पत्नी घरांत आहेत का?

— हो त्यांची अर्धांगी होण्याचं थोर भाग्य मलाच लाभलेलं आहे. — ती हसत हंसत म्हणाली. तिच्या त्या हंसण्यांत हर्षापेक्षां खिन्नतेचाच भाग अधिक होता. कांहींतरी बोलणें त्या वेळीं मला तरी भागच होतें. कारण विचित्र अशा स्तब्धतेमुळें माझें कोमल मन बारा वर्षांमागं प्रवास करूं पहात होतं. म्हणून मी म्हणालों,

— रतिलाल आपणाशीं कधीं तरी उमेद नांवाच्या आपल्या एखाद्या लंगोटियार स्नेह्यासंबंधीं बोलला आहे का?

मंदमधुर आकर्षक हास्य करीत ती म्हणाली,

— आपणच उमेदचंद शेठ. असंच ना?

— छे!

— मग कोण?

— मी आपला रतिलालचा मित्र उमेद आहें! चंद किंवा शेठचें शेपूट नाहीं आवडत मला. — मीही अगदीं मनमोकळेपणानं हंसलों.

— आपण तिकडचे स्नेही! आणि मी भोळी खुळी तुम्हांला चहासुद्धां न देतां उभी आहें! काय म्हणायचं होईल यायचं झालं तर?— इतकें म्हणून ती तरुणी आंत गेली आणि माझें विचारचक्र सुरू झालें.

रतिलाल आणि मी म्हणजे जिवाभावाचे मित्र! एकाच्या पायाला कांटा बोंचला तर दुसऱ्याच्या डोळ्यांतून गंगायमुनांचे

अनावर पूर यायचे एवढा आमचा आपलेपणा! त्यामुळें आमच्या जीवनांतील बारीक मोठ्या घडामोडी प्रत्येकाला ठाऊक होत्याच! व्यवसायभिन्नतेमुळें आम्ही एकमेकांच्या प्रत्यक्ष सहवासाला जरी पारखे झालों होतों तरी लांबलचक पण अवीट पत्रव्यवहाराचें सुख आम्ही आठवड्यांतून एकदां तरी न चुकतां अनुभवत होतों. त्यामुळें आमच्या जीवनांत एका तपाच्या कालावधींत झालेलीं स्थित्यंतरें प्रत्येकजण जाणून होता. रतिलाल शैलजा नांवाच्या एका तरुणीशीं विवाहबद्ध होऊन सुखांत आहे ही जी कल्पना त्याच्या पत्रव्यवहारावरून त्यानें करून दिली होती ती तिचें प्रत्यक्ष स्वरूप पाहून मात्र विरून गेली. रतिलालसारख्या रसिक, विवादचतुर आणि सौंदर्यप्रेमी तरुणाचें मन मी पाहिलेली शैलजा कधींच काबीज करूं शकणर नाहीं असें मला थोड्याच वेळांत कळून चुकलें होतें. शैलजाबेननें सुंदर "ट्रे" मधून चहाफराळाचं आणून माझ्यापुढं ठेवलं आणि त्या चवदार चहाची आणि खमंग फराळाची चव घेत मी माझ्या मनाशींच भांडूं लागलें. ती धीटपणें माझ्यापुढं उभी होती. आग्रहानें हें घ्या तें घ्या म्हणून चमच्यांमागं चमचे माझ्या बशींत टाकीत होती; पण, इतकेंहि झालें तरी रतिलालचें मन काबीज करूं शकणारी जादुगारीण ही केव्हांच असूं शकणार नाहीं ही जी दृढ समजूत मी केली होती ती कांहीं बदलेना.

मी घड्याळाकडे पाहिलें. बारा वाजायला अगदीं दोनच मिनिटांचा अवकाश होता. माझी अधीरता तिच्या ध्यानांत येऊनच कीं काय ती म्हणाली, – हं आलेच. हॉर्न वाजलाच कीं मोटारीचा! – असें म्हणत एखाद्या चपल बालकाप्रमाणें ती फुटपाथपर्यंत गेली

आणि रतिलालला बरोबर घेऊन दिवाणखान्यांत आली.

-- पाहिलंत हे कोण ते ?-- लाडिक आवाजांत ती नवऱ्याला विचारीत होती. रतिलाल म्हणाला, --आधीं थोडं थंडसं पेय आण पाहूं! मग बोलूं सावकाशीनें !

शैलजा आंत गेली आणि आम्ही बोलूं लागलों. बालपणांतील रम्य आठवणी किती सुखदायक असतात याचा अनुभव कुणाला नाहीं ? बोलतां बोलतां मला तर पुन:पुन्हां कॉलेज लाइफचें स्मरण झालें. त्यावेळचे ते प्रो. काळे, नटवी नंदिनी आणि अध्यापकांच्या खुर्चीत टाचण्या लावून मजा पाहणारा छोटू ओक यांच्या गोष्टी निघाल्या तेव्हां आम्हां दो[illegible]वरच्च शैलाबेनची हसून मुरकुंडीच वळली.

आमचें जेवण झालें. प्रत्येक हालचालींत शैलाची चलाखी दिसत होती. तिनं केलेला प्रत्येक पदार्थ फारच चवदार होता, पण सौंदर्याभावीं तिची कर्तबगारी खुलून दिसत नव्हती. आम्ही कॅरम खेळलों, पिंगपाँगहि खेळलों, भरपूर फिरलों. तिच्या प्रत्येक कृतीत आकर्षकता, पद्धतशीरपणा सर्व कांहीं होतें, पण ती स्वत: सुंदर नव्हती. सौगंधिक सुमन केव्हांहि सरसच पण सुंदर फुलांकडेच जनदृष्टि नाहीं का लागत ? शैला गुणी आहे त्याचप्रमाणें ती लावण्य-वती असती तर रतिलालच्या सौख्याला सीमा राहणार नव्हती. माझ्या मन:सागरांत रतिलालविषयक विचार येत होते पण तो मात्र अगदीं शांत होता. मानवी इच्छांची संपूर्णतेनं तृप्ति झाल्यासारखें सात्विक समाधान त्याच्या तेज:पूर्ण चेहऱ्यावर विलसत होतें.

## त्यागाचें समाधान

— काय, उमेद ! आज तुझं मन कांहीं बरोबर नाहीं दिसत ? इथं येऊन कुठं दोन दिवस झाले तों स्वरूपराणीची आठवण झाली कीं काय ?

— छे, छे !! तुजसारख्या सुहृद स्नेह्याच्या सान्निध्यांत असतांना जन्माची स्नेहसखी किंचित् काल दुरावली तरी त्याबद्दल मला विषाद वाटत नाहीं ! अशीच नाहीं का आपली मैत्री ?

— उमेद, आपली मैत्री अशीच होती, पण ती तशी नेहमींच असणं कसं शक्य आहे

— कां ?

— विवाहपूर्वकालीं कोणतीहि व्यक्ति प्रिय असली तरी विवाहोत्तर स्वपत्नीपेक्षां प्रिय अशी दुसरी व्यक्तिच पुरुषाला असतां कामा नये !

— काय म्हणतोस तरी काय तूं रतिलाल ?— मी आश्चर्यातिरेकानं म्हटलं.

— मी खरं तेंच बोलतों उमेद ! विवाहित पुरुषाची स्वस्त्री हीच देवता आणि —

— आणि काय ?

— आणि पत्नीचा पती हाच परमेश्वर असला पाहिजे !

— रतिलाल, हें वाक्य व्यासपीठावर उच्चारलें असतें तर टाळ्या पडल्या असत्या ! रतिलाल, मजसारख्या जीवाभावाच्या मित्राशीं अशी प्रतारणा कां ? मीं ज्या अनावर उत्कंठेनं इथं तुझा संसार पहाण्यासाठीं आलों ती माझी उत्कंठा आतां राहिलेली नाहीं.

माझा रतिलाल केवढा सौंदर्यप्रेमी! केवळ गालाला हंसतांना खळी पडत नाहीं म्हणून त्रिवेदींच्या इच्छागौरीसारख्या चटकचांदणीला अव्हेरणारा रतिलाल शैलजेसारख्या कुरूप—

— चुप, उमेद, काय बडबडतोस हें? तूं तुझ्या उघड्या स्वभावानुसार हें बोलतोस पण ह्या अविवेकी बोलांनीं माझ्या शैलाला न भरणारी जखम होईल. माझी शैला! माझ्या संसाराचं रम्य नंदनवन करणारी जादुगारीणच ती! ती आहे म्हणून मी माझा हा सर्व व्याप सांभाळून आहे. तिचे गुण एवढे मोलाचे आहेत कीं, तिचं सौन्दर्य कमी असलं तरी तें विशेष खुलून दिसतें. सौंदर्य हा निसर्गानें मानवाला दिलेला नजराणा आहे, पण गुण ही स्वतः कमावतां येणारी इस्टेट आहे. मला पहिल्यापेक्षां दुसरीचें महत्व जास्त आहे!

— रतिलाल, माझ्या बोलण्यानं तुला राग आलेला दिसतो. पण तुला राग आला तरी तूं खरेंखुरें आनंदी जीवन उपभोगतोस हें मला आता समजून आलें. मन प्रफुल्लित झालं. देवानं तुमचा संसार सदैव सुखाचा ठेवावा ह्यापेक्षां गोपाळकृष्णाकडे माझी अन्य प्रार्थना नाहीं!

— उमेद, चुकतोस तूं! संसार सुखाचा किंवा दुःखाचा करणें हें देवापेक्षां मानवाच्याच हातीं जास्त आहे!

— तें कसें?

— सुख हें मानण्यावर आहे. न लाभलेल्या वस्तूंचें चिंतन करण्यापेक्षां ज्याचा लाभ झाला आहे तें उघड्या डोळ्यांनीं पाहिलें

तर कां नाहीं आनंद होणार ?

त्याचं म्हणणं मला तितकंसं पटत नव्हतं. मी माझा स्वतःचा विचार करूं लागलों. 'माझी स्वरूपराणी किती सुंदर ? नुसतं अहमदाबादी पातळ पेहरून जरी ती बाहेर पडली तरी तिचं लावण्य लोक डोळ्यांचे दिवे करून कौतुकानं पहात ! लोक म्हणत, कोणतीही वरीवाईट वस्तु स्वरूपराणीनें स्पर्शिली म्हणजे मूर्तिमंत सौंदर्य अवतरतें ! पण लोकांना हेवा वाटणाऱ्या बाह्य सौंदर्याच्या आंत किती अभिमान, दर्प, हट्ट कांठोकांठ भरलेला आहे हें मीच काय तें जाणतों ! खरंच ! स्त्रीचं सौंदर्य तिच्या जन्माच्या सोबत्याला सुखविणारं पाहिजे, दुःखविणारं नको ! या दृष्टीनं पाहिलं तर मी केवढा दुर्भागी ! आपण सुंदर आणि त्या मानानं मी सामान्य म्हणून स्वरूपराणी मजकडे नेहमीं अनादरानेंच पाहते. पण शैलाबेन ? आपल्या सौंदर्याची उणीव ती अमोलिक अंतःसौंदर्यानें भरून काढते. आतां रतिलालनें तिला जादूगारीण म्हणून सन्मानिलें ! मी काय म्हणूं स्वरूपराणीला ? काय म्हणूं तिचं स्नेहशून्य वागणं पाहिलं म्हणजे! म्हणूं नये पण सर्पिणच म्हणावं लागेल तिला !' या विचारांनीं माझं डोकं जरा तापलं होतं. इतक्यांत शैलजा तिथं आली व मला म्हणाली, – उमेदभाई, येतां फिरायला जरा ?

– असे आडून खडे कां मारायचे ? विचारा ना रतिलालला!

– ते तर येतीलच, पण तुम्हीं ?

– गर्दी होत नसेल तर कांहीं माझी हरकत नाहीं ! तुम्हांसारख्या प्रेमळ जोडप्याच्या संगतींत तुमच्या मधुर संसारी जीवनां-

तील सुखसंवाद ऐकण्यास मी सदैव भुकेलेलों आहे !

– उमेदभाई, तुमच्या ह्या उद्गारावरून तुम्हीं वैवाहिक जीवनाचा आनंद उपभोगला नाहीं, उपाशीं आहां असेंच वाटतें !

– च् च्ः तसं नव्हे !

– तर काय ?-- तिनं कुतूहलानं विचारलं.

– कुणीही झालं तरी आपल्या माणसांच्या गोष्टी बोलूं नयेत !

– पण कुणाशीं ? परक्याशीं ! यांच्यासारखे स्नेही, उमेदभाई, नाहीं मिळायचे तुम्हांला ! आमच्या सुखमय संसाराची स्नेहसाखळी जुळल्यास आज कमी म्हटलीं तरी दहा वर्षें होत आलीं. पण ज्या ज्या वेळीं ह्यांनीं तुमची आठवण काढली नाहीं असें क्वचितच झालं आहे ! आणि अशा स्नेह्यांशीं तुम्हीं एवढ्या आंतल्या गांठीनें वागतां?

– तुम्हीं तरी कुठं तुमचं रहस्य उघड्यावर टाकलं आहे ?– मी टोमणेवजा शब्दांत बोललों.

– सांगा ना त्यांना आपली रहस्यकथा ! - शैलजाबेन रतिलालना म्हणाली.

– उमेद, तूं इथं आल्यापासून फार उदास बनलास हें माझ्या तीक्ष्ण नजरेंतून केव्हांच सुटलं नाहीं. या तुझ्या उदासपणांत मजविषयीं तुला वाटणारं निस्सीम प्रेमच अधिक आहे हें सुद्धां मी जाणतों. पण तुझ्या दृष्टीनें तूं जी सुखाची कल्पना आपल्या मानस-मंदिरांत मांडलेली आहेस ती केवढी चुकीची आहे म्हणून सांगूं !

– तसं नाहीं सांगायचं त्यांना !

– तर कसं ?– रतिलाल म्हणाला.

– त्यांच्या चुका नाहींच काढायच्या ! आपलें संसाराचें शास्त्र त्यांना सांगितलें म्हणजे स्वतःच्ता त्यागापासून केवढ्या मोठ्या समाधानाचा सांठा लाभूं शकतो हें त्यांना आपोआप कळेल !

– हो ! शैला, ही तुझी खुत्री अगदीं बरोबर आहे ! उमेद, स्वतःचं अन्न स्वतः मिळविल्याशिवाय लग्न करूं नये हा माझा निश्चय तुला माहीत आहे. ह्या माझ्या तत्त्वानुसार मी अनेक वधुपित्यांची व कोमलांतःकरणी कुमारिकांची निराशा केली. पण विधिघटना अशी होती कीं स्वतःलाहि ठाऊक असण्यापूर्वीं मला दुसऱ्यानं निवडलेली व नाकारलेली वधू आवडीनं पत्करणं भाग पडलं !

तो इतकें सांगून थोडा वेळ थांबला. त्याचं सांगणं जणूं काय तंत्रबद्ध पद्धतीचं आहे असा कबुलीजबाब देण्यासाठीं शैलजेनेंहि मान हालविली. माझी उत्कंठा अनावर झाल्यानें मी त्याला गोष्ट चालविण्याविषयीं विनंति केली त्यावेळीं रतिलाल म्हणाला, – तूं रेवाशंकरला ओळखतोस ना ?

हो !

– त्याचं अन् माझ्या लाडक्या शैलेचं लग्न ठरलं होतं !

– मग ?

– थांब ! सांगतों ना उमेद ! रेवाशंकर हा माझा तुझ्याइतका नसला तरी तो दोस्तच होता हें तुला ठाऊक असेलच !

– हो ! हो !

– त्यानं आपल्या लग्नाला येण्याबद्दल मला फार मोठा आग्रह केला आणि तो मान्य करून मी त्याजबरोबर गेलों. नवऱ्याचा

दोस्त म्हणून मला सगळीकडून बहुमान मिळत होता. लग्नाचा सारा वैदिक विधि पार पडला व फक्त विवाहमालाच अर्पण करण्याचें राहिलें होतें; पण तें होण्यापूर्वीच दोन्ही पक्षांत भयंकर स्वरूपाचा वाद माजला व त्याचें पर्यवसान लग्न मोडण्यात झालें.

— पण कारण ?

— कारण पैसा ? वधुपित्यानें कबूल केलेली हुंड्याची पुरी रक्कम आणली नव्हती, आणि तिच्याविना वरपिता लग्नाला मान्यता देत नव्हता !

— पण रेवाशंकर ?

— तो स्वयंप्रकाशित कुठं होता ? वडिलांच्या अन्नावर जग-लेल्या त्या जीवांत अन्नदात्याविरुद्ध बंड करण्याचा कणखरपणा कुठला ? मी त्याला सांगून पाहिलें, समजावून सांगितलें, पण सम-जूतदार असूनहि त्याची समजूत होईना ! एखाद्या आश्रयहीन गतभर्तृकेप्रमाणें दीनवाणीनं तो मला म्हणाला, "रतिलालभाई, मी सारं काहीं जाणतों. पण उदरनिर्वाहाचं साधन मिळविण्याची पात्रता अंगीं नसतांना मी बापाविरुद्ध बंड कसं करूं ?—"

तो थोडा थांबला.

— मग काय झालं? — झरझर चालणाऱ्या चित्तवेधक चित्र-पटाचा दुवा चुकला म्हणजे प्रेक्षक जसा रुपेरी पडद्याकडे आशोत्सुक दृष्टीनें पाहतो त्याप्रमाणें रतिलालकडे पहात मी विचारलं.

मला तेथील परिस्थिति पाहून अत्यंत खेद झाला. शैलजेचें प्रफुल्ल मुखकमल कोमेजून गेलें होतें. सुवासिक फुलांची सुबक विवाहमाला सुकली होती. शैलाचे आईबाप डोळ्यांतून टिपें गाळीत

होते आणि रेवाशंकरचे लोभी वडील आपण आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा करणार पण शैलाचं लग्न कुठंहि जमूं देणार नाहीं अशी भीष्मप्रतिज्ञा बोलून दाखवीत होते. कुमारिकांच्या दुर्दैवी जीवनाबद्दल त्यावेळीं माझ्या मनांत किती विचार आले म्हणून सांगूं ? माझं मन भांबावून गेलें. मला एकप्रकारची विवेकबुद्धि सुचली आणि त्या कल्पनेच्या तिरिमिरींत ज्या ठिकाणीं शैला मूकरुदन करीत बसली होती त्या ठिकाणीं मी गेलों आणि तिच्या समोर उभा राहिलों. मला पाहतांच तिचं भ्यालेलं कोमल मन अधिकच भयभीत झालें. पण तिला धीर देत मी म्हणालें, "शैला, आतां जर मी तुझ्याशीं विवाहबद्ध होण्याची कबुली दिली तर तूं या विवाहाला मान्यता देशील का ?"

— ह्या माझ्या अकल्पित प्रश्नानं ती आश्चर्यचकितच झाली. तरी पण ती धूर्ततेनं म्हणाली, "मजसारख्या मोलकरणीला राजाच्या राणीचं ऐश्वर्य कसं लाभेल ?"

— "उगीच शंका काढूं नकोस ! ज्या मुहूर्तावर तुझं रेवाशंकरशीं लग्न होणार होतं त्याच महन्मंगल मुहूर्तावर मी तुझं पाणीग्रहण करीन ! तर सांग ना !"

— "काय सांगायचं ?" ती हंसली. त्या हास्यांत सारा अर्थ सांठला होता. मी झटपट तिच्या वडिलांना जाऊन माझा मनोदय सांगितला आणि त्यानें मोठ्या आनंदानें मला हें अमोलिक रत्न अर्पिलें.

— त्यामुळें स्वकीयांना मी पारखा झालों. घरचा श्रीमंत असूनहि भिकारी बनलों. बाबा-आईचं कृपाछत्र नाहींसं झालं पण

ह्या सर्व त्यागाचं समाधान शैला आपल्या आदरणीय वर्तनानं मला देऊं लागली. आपल्याला सुखी करण्यासाठीं मीं केवढ्या ऐश्वर्यावर लाथ मारली, किती सुंदर कुमारिकांचीं मनें दुखविलीं ह्या जाणीवेनें शैला माझ्याशीं वागते आणि तिच्या शीतल-प्रेमळ छायेंत मला ब्रह्मांडाचं सुख लाभतं.

– प्रेम गुणांवर असतें, रूपावर नव्हे.

